प्रकाशक व व्यवस्थापक
रा. ज. देशमुख,
देशमुख आणि कंपनी
१९१ शनवार पेठ, पुणें २

संचालक
भ. त्र्यं. देशमुख,
बी.ए., एल्एल्. बी.


२ मुखपृष्ठावरील चित्र श्री. दीनानाथ दलाल यांचें आहे.

क्रमांक ४९
९ मार्च १९४४

मुद्रक
विठ्ठल हरि बर्वे,
आर्यभूषण मुद्रणालय,
९१५।१ शिवाजीनगर, पुणें ४.

# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें

### वि. स. खांडेकर

१ फुलें आणि दगड १॥।
२ घरट्याबाहेर १॥।
३ पहिलें प्रेम (आ. २ री.) ३
४ जळलेला मोहर ३
५ क्रौंचवध ४
६ सायंकाल (आ. २ री.) २॥
७ अविनाश १॥।
८ मंदाकिनी १॥।
९ सहा भाषणें २
१० कालिका २।
११ स्त्री आणि पुरुष २
१२ पांढरे ढग ४।

### ग. त्र्यं. माडखोलकर

१ अवशेष २
२ नागकन्या २
३ माझी नमोराणी २
४ नवे संसार (अन.) ४
५ चंदनवाडी ६॥
६ व्यक्तिरेखा २।

### ना. धों. ताम्हनकर

१ तात्या भा. १ ला. २॥
२ तात्या भा. २ रा. २
३ निखारे भा. १ ला. २॥
४ चकमकी १॥
५ [illegible] नवरा १॥

### चिं. वि. जोशी

१ आमचा निमणराव (आ. २) ३
२ नवें मास्तर २
३ स्टेशनमास्तर २

### साने गुरुजी

१ पुनर्जन्म २॥
२ आस्तिक २॥

### दत्तु बांदेकर

१ सख्याहरी १॥।
२ नवी आघाडी १॥

### द. र. कवठेकर

१ अपुरा डाव ३
२ रेशमाच्या गांठी ३
३ आभाळाची सांवली ४

### वा. म. जोशी

१ स्मृति-लहरी २
२ विचार-लहरी २।
१ नवें जग !–पु. य. देशपांडे २॥
१ रायचरित्र–भाई बंक १॥

### प. ले. वि. स. खांडेकर

१ काव्यज्योति १
१ पारंब्या आनंदीबाई जयवंत २॥

### लक्ष्मण० सरदेसाई

१ ढासळलेले बुरूज २

### प्रो. वि. ह. कुलकर्णी

१ व्यक्तिचित्रें २॥
१ फसगत–ना. ह. आपटे १॥
१ भाकरतुकडा–प्र. के. अत्रे १॥

### कृष्णाबाई मोटे

१ मीनाक्षीचें जीवन २।
१ चलतीं नाणीं र. गो. सरदेसाई २

### रा. श्री. जोग

१ सौंदर्यशोध आणि आनंदबोध ८
१ हितपत्रें–ना. स. पटवर्धन ३
१ चेंबीची नहाणवि. वि. बोकील ३
१ ग्रह आणि तारे-सत्यग्राही ४॥

### अनंत काणेकर

१ धुक्यांतून लाल ताऱ्याकडे ३

### काकासाहेब कालेलकर

१ ब्रह्मदेशाचा प्रवास १॥

### य. दि. पेण्ढरकर

१ प्रापंचिक पत्रें ३
१ स्टॅलिन–वि. म. भुस्कुटे ३॥

### कमलाबाई टिळक

१ आकाशगंगा २॥

# आगामी प्रकाशनें

**वि. स. खांडेकर**

१ अश्रु
२ बुद्ध आणि हिटलर
३ चल ये राणी
४ विसावें शतक
५ तिसरी भूक
६ वर्षाकाल
७ छाया भाग १-२
८ वालुका
९ कालचीं स्वप्नें
१० चार भिंती
११ मंजिऱ्या
१२ मराठीचा नाटयसंसार
१३ वा. म. जोशी ( व्यक्ति आणि वाङ्मय )
१४ फुलें आणि काटें
१५ पहिली लाट
१६ कल्पलता

**ग. त्र्यं. माडखोलकर**

१ तीन दिवस
२ ऋणभार
३ माझे आवडते कवि
४ चक्रवर्ती उदयन
५ उर्वशी

**द. र. कवठेकर**

१ आपुलकीची झळ
२ ढगाआड
३ आग आणि पाणी

**कुसुमावतीबाई देशपांडे**

१ मोळी

**ना. धों. ताम्हनकर**

१ निवाडे भा. २ रा
२ गुजाताई
३ अनेक आशीर्वाद
४ दाजी भा. १ ला
५ शेजारी

**य. दि. पेण्ढारकर**

१ घायाळ

**प्र. के. अत्रे**

१ ललित वाङ्मय
२ ' मी ' कसा झालो

**कृष्णाबाई मोटे**

१ अनामिकेची पूजा
२ कलाक्षेत्रांत
३ मवाली

**काकासाहेब कालेलकर**

१ स्मरण यात्रा

**अनंत काणेकर**

१ उघडया खिडक्या
२ काळे आणि पांढरे
३ पिकलीं पानें ( दुसरी आवृत्ति )

**चिं. वि. जोशी**

१ गुंडयाभाऊ
२ दरबार कथा

**दत्तु बांदेकर**

१ हिरवी माडी

**ना. ह. आपटे**

१ साजणी

**शकुंतलाबाई परांजपे**

१ भिल्लिणीचीं बोरें

## पूर्व स्मृति

## १

गंगा आपल्या मृत्युशय्येवर पडली होती. भोंवतालच्या परिस्थितीचें भान सुटत चाललें होतें; शरीर कसें हलकें व निराधार वाटत होतें; अवयवांचें स्पर्शज्ञान हरपलें असावें, कारण अंगाखालची घोंगडी खरखरीत लागत नव्हती; अंगावरचें धोतर मऊ लागत नव्हतें, स्पर्शासाठीं जीव थरारत होता; पण कुठलाच स्पर्श कळत नव्हता.

गंगाचे ओंठ कोरडे पडले होते; जीभ आंत ओढत होती; जीभ बाहेर आणून, ओंठावरून फिरविण्याचा मोठ्या कष्टानें तिनें एकवार प्रयत्न केला, पण तो फुकट गेला.

इतक्यांत ओंठावर, डोळ्यांवर कांहींसें गारगार लागलें आणि गंगेच्या शरीरावर आत्यंतिक समाधानाचे रोमांच उभे राहिले.

अवयवांची शुद्धबुद्ध लोपली नव्हती तर! मनाचा जाणतेपणा सुप्त नव्हता अगदींच!

तुळशीपत्रें होतीं तीं. थंडगार, पवित्र, सुखकर, गंगेच्या भाविक सुनेनें म्हाताऱ्या सासूच्या तोंडांत मरणकाळीं तुळशीपत्र घातलें होतें.

अहाहा, काय मधुर, सात्त्विक स्पर्श !

मरणकाळीं सारें गतायुष्य भर्‌र्कन् डोळ्यांसमोरून जातें म्हणतात; तुलसी-दलाच्या स्पर्शानें, गंगेच्या गतायुष्याच्या स्मृति जागृत झाल्या.

  

कष्टमय होतें गंगेचें बाळपण; घरावर दारिद्र्याची अवकळा पसरलेली, गरीबीमुळें, अकर्तृत्वामुळें, व्याधिग्रस्ततेनें नेहमीं खिन्न असलेला बाप; दुबळ्या व्यक्तिमत्वामुळें, भ्याल्यासारखी नेहमीं घरांत वावरणारी आई; अशक्त, कळा-हीन, दीनवाणीं भावंडें; गंगेचें बाळपण तिला एखाद्या काळोख्या, वादळी रात्रीं पडलेल्या भीषण दुःस्वप्नासारखें भासे; होतां होईतों त्याची आठवण गंगा आपल्या मनाला करूं देत नसे; पण आज, लहानपणची एक रात्र ढळढळीतपणें गंगेच्या डोळ्यांसमोर उभी राहिली.

तिरसट नवरा व कडवट सासू या कैचींत सांपडलेल्या गंगेच्या आईच्या डोळ्यांतून टिपें पडलीं नाहींत, असा दिवस क्वचित्‌च जाई; पण त्या दिवशीं विशेषच कांहींतरी बिनसलें आहे असें गंगेच्या बालबुद्धीच्या सुद्धां लक्षांत आलें. मुलांचीं जेवणें होऊन, तीं अंथरुणांवर येऊन पडलीं होतीं. गंगेचा अर्धवट डोळा लागला होता; स्वयंपाकघरांत कडकडाट चालला होता. गंगेला आपल्या आईचे हुंदके ऐकूं येत होते. गंगेच्या बापानें, बरेंचसें कांहीं तण-तणत आपल्या खोलीचें दार खाडकन् लावून घेऊन आंतून कडी लावली; गंगेच्या आईचे हुंदके वाढत होते; ते ऐकतां ऐकतांच गंगा झोंपीं गेली.

आपल्या शेजारीं येऊन लवंडलेल्या आईच्या चाहुलीनें गंगा पुन्हा अर्ध-वट जागी झाली. इकडून तिकडे चाळवत ती कांहींसें बडबडली, व एकदां दोनदां कण्हली. गंगेची आई चटकन् उठून बसली; गंगेचें पांघरूण सारखें करून तिनें तिला डोक्यावर थोपटलें.

" गंगा, काय ग ! नीज हं; मी आहें तुझ्याजवळ अं. "

गंगेच्या कपाळावरचे केस मागें करून गंगेच्या आईनें तिच्या चेहऱ्याकडे टक लावून बघितलें,–आणि टपकन् दोनचार कढत आंसवें गंगेच्या कपाळावर पडलीं.

आपल्याप्रमाणेंच आपल्या पोरीच्याही कपाळीं हालअपेष्टा, अपमान, दुःखं लिहिलेलीं असतील कीं काय,–या विचारानें, आंतड्याला पीळ पडून निघालेलीं तीं आंसवें,—त्या आंसवांचा तो सात्त्विक, वत्सल पण दुःखद स्पर्श—त्या स्पर्शाची रोमांचकारी स्मृति गंगेच्या डोळ्यांपुढें आज उभी राहिली.

  

बाळपण संपत आलें. आईबापांचा मोडकातोडका संसार पहातां पहातां, स्वतःच्या भावी गोड संसाराचीं सुखस्वप्नें गंगा पहात होती.

तिच्या वाड्यांत एक तरुण मुलगा राहात होता; दोन्हीं कुटुंबांत पुष्कळ ओळख; जायें; बायकांत परस्पर सोयरिकीचीं थट्टेथट्टेचीं बोलणीं; गंगा हळुहळू त्या मुलाकडे निराळ्या दृष्टीनें पाहूं लागली; त्याला लाजूं लागली; तो अभ्यासाला बसला म्हणजे घटकान् घटका त्याच्याकडे आडून, पाहात राहूं लागली. त्याला " ते " कल्पून मोठमोठे ' न्यारे ' बंगले हवेंत उडवूं लागली. त्याच्या वृत्तीचा मात्र गंगेला कांहींच अदमास लागला नव्हता. तो चारचौघांत तिच्याशीं हंसे बोले; पण अंतरीची खूण पटवून घेण्याची संधि गंगेला अजून मिळाली नव्हती.

त्या दिवशीं तो मोठ्या परीक्षेला जायचा होता. घाईघाईनें जेऊन उठला. देवाला, आईला, आतेला नमस्कार केलान्; " शेजारच्या काकूंना, आजींना नमस्कार करून जा हो, " आई म्हणाली त्याची.

गंगेची आजी स्वयंपाकघरांत भाकरी थापटीत होती; गंगेची आई शेजारींच ताक करीत होती; त्यानें दोघींना नमस्कार करून त्यांचा आशीर्वाद घेतला. माजघर ओलांडून तो ओटीवर आला.

तेथें ओटीवरच्या झोंपाळ्याची कडी धरून गंगा उभी होती. तो तिच्याकडे ओझरतें बघून, " जातों हं. " असें कांहींतरी म्हणत, पुढें सरकत होता;—

इतक्यांत गंगेला काय ऊर्मि आली कोण जाणे; चट्कन् जरा पुढें होऊन ती कांहींशी लडिवाळ आवाजांत म्हणाली,

" अन् मला नाहीं वाटतं करायचा नमस्कार ! "

आपल्या थट्टेला तो काय गोड प्रत्युत्तर देतो याची गंगा आतुरतेनें वाट पहात होती. तिला वाटलें तो जवळ येऊन आपल्या गालावर टिचकी मारील आणि ओंठ जुळवून पुढें करून म्हणेल,

" तुला नमस्कार ? तसा नाहीं, —हा अस्सा करायचा "—

गंगेच्या अंगावर रोमांच उभे राहिले.

निदान गंगेला वाटलें, तो आपल्यापुढें हात ओंवाळीत म्हणेल,

" अहाहा, नस्कार करायला तूं मोठ्ठी आज्जीबाईच कीं नाहीं ! "

पण त्यानें खरोखरी जें केलें त्यानें गंगा स्तंभितच झाली.

" नमस्कार ना ! हो, हो, करतों कीं " असें म्हणत, तो पुढें येऊन खालीं वांकला; त्याच्या बोटांचा गंगेच्या आंगठ्याला ओझरता स्पर्श झाला.

गंगा गोंधळली, बावरली, ओशाळली, हिरमुष्टी झाली. तो अत्यंत हवाहवासा वाटणारा किंचिदुष्ण, मृदु स्पर्श; सुखकर पण तापदायक; त्या स्पर्शानें गंगेचीं सारीं सुखस्वप्नें भंगलीं. पण त्या स्पर्शानें तिच्या साऱ्या अंगावर थरारलेला कांटा आज गंगेच्या स्मृतिपटलावर ठळकपणें उमटत होता.

  

आतां गंगा मोठी बाई झाली होती; चारपांच मुलांची आई झाली होती; गंगेचा मुलांवर सारा जीव !

मातृत्वाचीच वत्सल भावना ती; पण बाकीच्या साऱ्या भावनांचा कोंडमारा झाल्यामुळें गंगेचें मातृत्व फारच उत्कट स्वरूपांत प्रकट झालें होतें.

अशीच एक दिवस धाकट्या तान्ह्या मुलाचे गोड गोड पापे घेत, त्याचें

कौतुक करीत, गंगा बसली होती; मोठा पांचसहा वर्षांचा बाबू दुडदुड धांवत आला आणि आईच्या अंगाशीं झटूं लागला;

" माझा पापा घे ना. "

गंगा त्याला दूर करीत त्याच्या अवखळपणानें अर्धवट त्रासून, अर्धवट थट्टेनें म्हणाली,—

" चल, तुझ्यासारखा घोड्याचे कां कुणी पापे घेतं ? " बाबू रुसून दूर गेला.

नंतर आठ दिवस मुद्धां लोटले नाहींत. बाबू देवीच्या आजारानें हैराण झाला होता. तान्ह्याला दूर करून, गंगा बाबूच्या सेवेला लागली होती. बाबूचा आजार कठीण होता. ताप भयंकर, बाबू बेचैन, बेभान–वाटेल तें बडबडत होता, गात होता, हंसत होता.

ते आवाज गंगेचें काळीज चरचर कापून जात होते !

बेशुद्धींतच बाबूनें गंगेचा पदर धरला; हाताला झटत तो बडबडूं लागला, " पापा घेना,–माझा पापा घे.–घोडाचा कसा घेतेस.–माझा घे ना. "

गंगेचें हृदय फाटलें; डोळ्याला गळती लागली. तिनें बाबूच्या चेहऱ्याकडे बघितलें. देवीच्या फोडानें त्याचें तोंड नुसतें फुलून गेलें होतें; तीळ ठेवायलाही जागा नव्हती; पण गंगेनें खालीं वांकून त्याच्या ओंठांवर आपले ओंठ टेकले व त्याचा एक दीर्घ पापा घेतला.

ते तप्त, शुष्क, बेभान स्थितींतही आईच्या ओंठांना घट्ट बिलगूं पहाणारे, व्याधीनें पीडलेले ओंठ–त्या ओंठांचें गंगेनें आजवर हजारों–लाखों वेळां चुंबन घेतलें असेल;–पण त्या वेळचा तो उत्कट, पण अत्यंत भयंकर भासणारा पोटच्या गोळ्याच्या ओंठांचा स्पर्श–त्या स्पर्शांत भीति, वात्सल्य, पश्चात्ताप, निराशा सामावून राहिलीं होतीं;

त्या स्पर्शाची स्मृति आज गंगेच्या मनांत जागृत झाली.

  

गंगेच्या आयुष्याची गाडी आतां उतरणीस लागली होती. भुकेलं बाळपण, निष्प्रेम, रखरखीत वैवाहिक जीवन, अपत्यविरहानें ठेंचाळलेलें प्रौढपण—किती कठीण होती ती पहिली चढण; त्या मानानें आतां ही उतरण निवांत, सुखकारक, शीतल भासत होती. गंगा, गंगेचा नवरा, आतां पिकलीं पानें झालीं होतीं. नवसासायासांनीं जगलेला एककुलता एक मुलगा संसाराला लागला होता; भोंवतालच्या चिमण्या चिवचिवाटांत गंगेचें वत्सल मन समाधान पावत होतें. आतां गंगेची देवापाशीं एकच साधीभोळी मागणी होती.

" देवा मला अहेवपणीं मरण येऊं दे—"

पण देवाच्या मनांत निराळेंच होतें.

गंगेचा नवरा थकत चालला, अगदीं अंथरुणाला खिळून पडला. गंगा त्याची शुश्रूषा आपल्या परीनें अतोनात करी. त्याच्या उशाशीं बसून ती टिपें गाळी. आज चाळीस वर्षांचा सहवास; चाळीस उन्हाळेपावसाळे एकमेकांच्या निवाऱ्यानें घालविलेले. नुसत्या सहवासाची तरी माया थोडी का असते !

म्हाताराही कधीं कधीं अगदीं विरघळून जाई. गंगेकडे टक लावून तो घटकाघटका बघत राही. ती पाय किंवा डोकें दाबूं लागली कीं, डोळे मिटून तो तासन्तास स्वस्थ पडे; आणि कधीं कधीं त्याच्या मिटल्या डोळ्यांआडून दोन थेंब घळकन् त्याच्या सुरकुतलेल्या गालांवर ओघळत.

एक दिवस असेंच झालें; गंगेच्या डोळ्यांनाही पाणी आलें.

" हें काय ! " ती म्हणाली, " वाईट कसलं वाटून घ्यायचं ! देवाच्या दयेनं सगळं यथास्थित आहे. उभ्या जन्मांत कुणाचं वाईट चिंतलंसुद्धां नाहीं. आतां हंसत देवाच्या घरीं जायचं, अन् मग हें काय बरं मांडलंय् आतांशा ? "

" तुझ्यासाठीं,—तुझ्यासाठीं वाईट वाटतं. " म्हातारा गहिंवरल्या आवाजानें म्हणाला.

" देवाची इच्छा. " गंगा उसासा सोडीत म्हणाली " कुणी आधीं, कुणी मागून,—चाललंच आहे— "

" तसं नव्हे ग " म्हातारा म्हणाला. " दुसरीकडे कुठं मन ओढत नाहीं,

पण एकच गोष्ट काळजाला झोंबतीय्.—माझ्या संसारांत आज चाळीस वर्षें खपलीस; बऱ्यावाईटाला आधार झालीस; कधीं शब्दाबाहेर गेली नाहींस, मन मोडलं नाहींस–पण मीं मात्र तें कधीं जाणलं नाहीं; कधीं तुला गोड शब्द बोललों नाहीं; जिव्हाळ्यानं तुझं सुख पाहिलं नाहीं; कधीं मायेनं जवळ ओढलं नाहीं—"

म्हाताऱ्याला पुढें बोलवेना; त्याच्या गालावर आंसवें पडत होतीं, त्यानें आपला निःशक्त हात वर उचलला आणि जवळ बसलेल्या गंगेच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरविला.

गंगेच्या अंगावर थरारून कांटा उभा राहिला.

सुरकुतलेल्या, निर्माल्य झालेल्या, भावना मेलेल्या हाताचा तो थंडगार पण प्रेमळ, निर्जीव पण उत्कट स्पर्श–त्या दुबळ्या स्पर्शांतून गंगेच्या दुबळ्या शरीराला भेटलेला जिव्हाळा;—हा असा जिव्हाळा गंगेला याच हातांतून चाळीस वर्षांपूर्वीं लाभला असता तर,–तर गंगेच्या आयुष्याचें सोनें झालें असतें! गंगेच्या हृदयाला पीळ पडला त्या स्पर्शानें!

पण आज या शेवटच्या घटकेला गंगेला ती स्मृति सुखदायक होत होती.

आणि आतांचा हा शेवटचा तुलसीदलाचा शीतल, सात्विक, सुखकर स्पर्श! या स्पर्शानें जीवनांतील भल्याबुऱ्या स्मृति जागृत झाल्या तशा क्षणभरानें लोपूनही गेल्या. भावी जीवनाची, जीवशिवाच्या मिळणीची गोड चाहूल त्या तुलसीदलानें गंगेला ऐकविली. गंगेच्या आत्म्याला खरीखुरी शांति, सुख, समाधान आतां लाभलें. आत्यंतिक सुखानें गंगेचें शरीर रोमांचित झालें, स्मितहास्यानें ओंठ थरारले.

"आहे, अजून जीव आहे." हललेल्या तुलसीपत्राकडे पाहून कोणसें म्हणालें.

पण गंगाचा आत्मा केव्हांच सच्चिदानंदस्वरूपीं विलीन झाला होता.

" आईबाप नाहीं, पूर्वजन्मींचे वैरी आहांत तुम्ही वैरी—"

घनश्याम आवेशानें म्हणत होता. डोळ्यांत गर्दी करूं पहाणारे अश्रू धोतराच्या सोग्यानें तो आंतल्या आंत टिपीत होता, व ओंठ घट्ट मिटून हुंदका आंतल्या आंत गिळून टाकीत होता. खेदाचे अश्रू व हुंदके असे दबले गेल्यामुळें, त्याच्या भावना साहजिकच संतापाच्या रूपानें खदखदून बाहेर पडत होत्या.

एकीकडे यशवंतराव व एकीकडे शालिनीबाई त्याचे संतापाचे शब्द वरकरणीं स्तब्धपणें ऐकून घेत होतीं. यशवंतरावांचें तोंड आत्यंतिक खेदानें व मनस्तापानें काळवंडलें होतें. शालिनीबाईचा पदर भिजून ओलाचिंब झाला होता. शेवटीं, घनश्यामाचे उपमर्दकारक शब्द असह्य होऊन यशवंतराव उठले व एक दीर्घ उसासा सोडून, डोक्यावर टोपी ठेवून खोलीबाहेर निघून गेले. त्यांचा वैताग पाहून घनश्यामाचा संताप कांहींसा निवाला; पण दुस-

त्याच क्षणीं, कांहींसें सुचल्यासारखें करून, त्यानें शालिनीबाईकडे मोर्चा वळवला व तीक्ष्ण स्वरानें तो म्हणाला,

"आणि बाबांच्यापेक्षां सुद्धां, आई, तूंच, तूंच, कारण आहेस माझ्या आयुष्याचा सर्वनाश होण्याला!"

शालिनीबाई चमकल्या. घनश्यामानें असा दोषारोप एकाएकीं आपणावर केल्याचें पाहून त्या गोंधळून गेल्या. काय बोलावें हें त्यांना समजेना; म्हणून भुंवया उंच चढवून त्यांनीं नुसतेंच घनश्यामाकडे चमत्कारिक नजरेनें बघितलें.

त्यांनीं कांहीं अशा शब्दांची त्यावेळीं घनश्यामाकडून अपेक्षा केली नव्हती. त्यांना वाटलें, यशवंतराव उठून गेल्यावर तर घनश्यामाची जीभ फारच सैल सुटेल आणि कदाचित् आपल्या पित्याच्या दारिद्र्याबद्दल तो बेफामपणें बोलूं लागेल. त्यावेळीं, यशवंतरावाचे अनेक सद्गुण त्याच्या नजरेस आणून देऊन, त्याचा पित्याविषयींचा आदर पूर्ववत् कसा राखावा याविषयीं त्या मनांत योजना करीत होत्या. यशवंतरावांचा काय बरें दोष! मरेमरेतों अभ्यास करून प्रत्येक परीक्षा एम्. ए. पर्यंत सेकंड क्लासमध्यें ते पास होत गेले होते. पण शेवटीं, नशीबानें त्यांना हात नाहींच दिला. पंचाहत्तर रुपयांच्या मास्तरकीवरच त्यांना शेवटीं रखडत पडावें लागलें होतें. शहरची राहाणी, चारपांच कच्चींबच्चीं पदरीं. अशा स्थितींत सर्वांत वडील मुलानें मॅट्रिकच्या परीक्षेमधून सटकल्याबरोबर, पोष्टाबिष्टांत नोकरी धरून आपल्या दुबळ्या संसाराला हातभार लावावा व कॉलेजांतील निरुपयोगी शिक्षणाचा नाद सोडून द्यावा, असें त्यांना वाटलें तर त्यांत काय आश्चर्य! आपल्या बुद्धिमान् मुलांना आपल्या गरिबीपायीं प्रत्येक गोष्टींत मागें पाय घ्यावा लागणार, या जाणिवेनें त्यांचें अंतःकरण तळमळे. बी. ए. पर्यंत शिकलेल्या आपल्या चतुर पत्नीला, प्रेमापायीं आपल्यासारख्या दरिद्र्याच्या गळ्यांत गळा गोवल्यामुळें मोलकरणीसारखें घरांत चारी प्रहर राबावें लागतें, हें पाहून त्यांना मरणप्राय दुःख होई. कोठें शिकवणी कर, क्लास काढ, टाइ-

पिंग कर, अशा हरतऱ्हा करून ते आपला फाटका संसार सांधण्याचा प्रयत्न करीत; पण मूळांतच अपुरं, तें जोडून किती जोडलें जाणार ?

हे असे विचार शालिनीबाईच्या मनांत येत होते. तेव्हां साहजिकच यशवंतरावांना अजिबात वगळून आपल्याकडेच मुलांचा सर्वस्वी मोर्चा वळलेला पाहून त्यांना आश्चर्य वाटलें आणि अतिशय, अतिशयच खेद झाला.

साऱ्या अंतर्बाह्य संसारांत, त्यांचें हें एवढेंच मर्मस्थान होतें. आपल्या लाडक्या मुलांसाठीं आपल्या सुखाचा, आपल्या स्वातंत्र्याचा, व्यक्तित्वाचा, आपण होम केला याबद्दल त्यांना फार अभिमान व आनंद वाटे. कांहीं हौस म्हणून, कांहीं नवऱ्याच्या संसाराला हातभार म्हणून, मूल होईपर्यंत त्यांनीं एक चांगलीशी नौकरी केली होती. त्यावेळीं अर्थात्‌च दोघां नवराबायकोंना राजाराणीसारखें थाटांत राहतां येत असे. पण श्यामचा जन्म झाल्याबरोबर सोन्यासारख्या नोकरीवर लाथ मारून शालिनीबाई आपल्या मुलाची दाई व आदर्श आई बनल्या; वाढत्या संसाराबरोबर अर्थात्‌च त्यांना हळूहळू स्वयं-पाकघरांतलेंही राज्यपद घ्यावें लागून, चिल्लयापिल्ल्यांचा चारापाणी, धूघास यांमध्यें त्यांचा सारा जन्म वेंचला जाऊं लागला; याबद्दल यशवंतरावांना एखादेवेळीं विषाद वाटे; पण शालिनीबाईंना या आत्मयज्ञाबद्दल अभिमान वाटे. यशवंतराव एखादेवेळेस त्यांना आदर्शमाता, म्हणून त्यांच्या निःस्वार्थी मातृप्रेमाबद्दल गौरवीत. त्यावेळीं शालिनीबाईचें अंतःकरण आनंदानें भरून येई व त्यांना आपलें जीवन सार्थकीं लागण्याची खात्री पटे.

पण आज ! आज त्यांचा, तळहातावरच्या फोडासारखा तालेवारानें वाढविलेला श्याम म्हणत होता.

" तूंच, तूंच कारण आहेस माझ्या आयुष्याचा सर्वनाश होण्यास. "

साहजिकच शालिनीबाई आश्चर्यानें, खेदानें, संतापानें स्तंभित झाल्या. तोंड उघडून घनश्यामाला त्याच्या विचित्र शब्दांचा अर्थ विचारायचा प्रयत्न केला, तर मनःक्षोभानें आपल्याला रडूं कोसळेल, अशी त्यांना भीति वाटूं

लागली. म्हणून रागानें व अश्रूंनीं डबडबलेल्या डोळ्यांनीं त्या नुसत्याच त्याच्याकडे पहात राहिल्या.

" आई ! " घनश्याम आईच्या त्या विलक्षण मूकतेनें जास्तच चिडून म्हणाला, " पहातेस काय अशी माझ्याकडे ! मी अगदीं खरं बोलतों आहें. शेजारच्या शरच्चंद्राकडे पहा ना. "

शरच्चंद्राकडे ! शालिनीबाई चपापल्या. हो खरेंच; शरच्चंद्रही यंदा मॅट्रिक पास झाला होता व त्याच्या आईवडिलांनीं त्याला मोठ्या हौसेनें कॉलेजांत घातलें होतें. पुढें एंजिनियरिंगचा कोर्स घेण्याची त्याची उमेद होती, व त्याच्या आईवडिलांची त्याला पूर्ण संमति होती. घनश्याम पुढें बोलतच होता.

" मीं गणित अन् सायन्सवर मरेमरेतोंपर्यंत परिश्रम घेतले, मला एंजिनियरिंगला जायची हौस आहे म्हणून. अन् बाबा आतां म्हणतात कीं नोकरी धर. शरच्चंद्राची काय चैन पहा.—"

" पण माझ्या राजा " आपल्या कोंदटलेल्या भावनांना अश्रूवाटें मोकळेपणीं वाट फोडीत, शालिनीबाई म्हणाल्या, " शरदचीं आईबापें श्रीमंत आहेत.—"

" आईबाप कशाला म्हणतेस उगीच ? " घनश्याम तिरस्कारपूर्ण स्वरानें म्हणाला, " नुसती आई म्हण. शरदच्या बाबांना आमच्या बाबांइतकाच पगार आहे. पण त्याची आई दरमहा दीडशेंची भरभक्कम भर घालते आहे ना घरांत ! मग काय कमी आहे बेट्याला ! "

काय कमी आहे ! शालिनीबाईच्या हृदयाला जखमेवर मीठ चोळल्याप्रमाणें वेदना होऊं लागल्या. आपल्या उदार, निःस्वार्थी भावना या कोंवळ्या, अननुभवी, पोराला कशा एकदम समजवाव्या हें त्यांना कळेना.

" श्याम, शरदूला काय कमी आहे म्हणतोस ? अरे, सारे वैभव असून काय उपयोग ? आईचा पैसा त्याला पुष्कळ आहे, पण आईच्या सदैव खऱ्या अशा मायेच्या पांखरेला तो पारखा झाला आहे, समजलास ? "

" करायची काय नुसती आईच्या मायेची कोरडी पांखर ?" श्याम अव-हेलनेनें म्हणाला. " त्या अदृश्य काल्पनिक प्रेमाच्या उबेपेक्षां, पैशाची ऊबच जास्त फायदेशीर असते. आणि—"

एकदम पूर्वीच्या आठवणींची गर्दी होऊन, काय आणि किती बोलूं असें श्यामला झालें.

" आणि कशावरून म्हणतेस तूं कीं शरद आईच्या मायेला पारखा आहे म्हणून ? मला आठवतंय लहानपणचं. आईची शाळेंतून यायची वेळ झाली कीं शरद घरट्यांतल्या पिल्लासारखा चिवचिवून तिची वाट पहायचा; आणि त्याची आई सुद्धां आली नि आली कीं त्याला आपल्या मायेनें कशी वेंघून घ्यायची. नाहीं तर आमच्या घरांत ! मुलांच्या कटकटीला तूं नेहमीं त्रासलेली आणि तुझ्या दबकावणीला आम्ही नेहमीं भ्यायलेले. शरदची आई कधीं कुठें गेली कीं, त्याला कशीं नानातऱ्हेचीं खेळणीं, खाऊ आणायची, नानाप्रकारचे कपडे करायची. आम्हांला नाहीं कधी आठवत तूं आमची अशी नानातऱ्हेची हौस केलेली. "

शरदचीं खेळणीं. कपडे पाहून आपण केलेले हरतऱ्हेचे हट्ट व त्याला मिळालेल्या गोड वा कडू वाटाण्याच्या अक्षता आठवून, घनश्यामनें लहान मुलासारखे गाल फुगवून ओंठ पुढें काढले.

" बाळा, आम्ही गरीब होतों रे ! " घनश्यामाच्या न्याय्य तक्रारानें विर-घळून शालिनीबाई म्हणाल्या. " आम्ही कुठून तुमचे हट्ट पुरवावे ! मला वाटत होतं, माझं निःस्वार्थी प्रेम आणि मीं केलेली तुमची अविश्रांत जोपा-सना, तुम्हांला या कोडकौतुकांपेक्षां जास्त मोलाची वाटेल," शालिनीबाईनीं एक दीर्घ उसासा सोडला.

" तुम्ही गरीब होतां, तीं तुमच्याच कर्मानं—नव्हे तुझ्याच चुकीनं. तूं जी नौकरी सोडलीस, तीच शरदच्या आईनें धरली, असं बाबा एकदां म्हणत होते, खरं ना ? मग काय तर ? तूं लाथाडलेलं सारं सुख अनायासेंच शरदच्या आईला लाभलें. "

खरेच, खरेच ते. शालिनीबाईना साऱ्या जन्मांत प्रथमच आपण केलेल्या गोष्टीबद्दल खेद झाला. शरद्‌ची आई विद्वान्, उच्चपदावर अधिष्ठित, धनवान् म्हणून चार मोठ्या लोकांत गौरवानें मिरविते, घरांत सोन्याचा संसार थाटते आणि आपल्या मुलांचा भविष्यकाळ उजळते. आणि आपण— ? आपली विद्या आपण कवडीमोल केली. एखाद्या सामान्य मजुरणीप्रमाणें केरपोतेरे करून आपलें आयुष्य आपण धुळींत मळवलें—आणि हाय देवा ! आपल्या मुलांच्याही आयुष्याची धुळधाण होण्याला आपण कारण झालों कां ?

छे, छे. विचारच सहन होईना हा त्यांना—छे. कांहींतरी कुठेंतरी चुकत आहे. कां केलें आपण असें ? कांहींतरी कारण असेल ना त्याला ?

शालिनीबाई थोडा वेळ अगदीं स्तब्ध बसल्या. नंतर डोळे पुसून, शांतपणें पण किंचित् कंपित स्वरानें व विकल मुद्रेनें त्या बोलूं लागल्या.

घनश्याम, तूं म्हणतोस तशा आर्थिक दृष्टीनें मीं कधीं विचारच केला नाहीं या प्रश्नाचा. माझ्या मनानें, लग्न झाल्यापासून, मीं आपलें एक कर्तव्य निश्चित करून ठेवलें होतें. माझ्या मुलांचें योग्य संगोपन मी स्वतः अंग मोडून करीन; त्यांच्या कोवळ्या शरीराला, बुद्धीला आणि शीलाला योग्य वळण लावीन आणि सुशिक्षित मातांचीं मुलं कशीं सुदृढ, सुजाण, सुशील असतात याचा आदर्श जगापुढें ठेवीन. अशी दृढ प्रतिज्ञा मीं विवाहित आयुष्यांत पदार्पण करतांच केली."

आपल्या मुलाकडे अभिमानपूर्ण, वत्सल नजरेनें पहात, शालिनीबाई म्हणाल्या.

"आणि ती प्रतिज्ञा देवदयेनें मला पुरी करतां आली. पैशाचं नकली वैभव मला कधीं मिळालं नाहीं; पण माझ्या पवित्र प्रतिज्ञापूर्तीनें माझ्या मनाला अपूर्व शांतीचें सुख लाभलं आहे."

"तुझ्या मनाला शांति लाभली; पण आमच्या मनाची शांति, भविष्यकालीन आयुष्याच्या काळजीनें, कायमची रसातळाला गेली, याची काय वाट ?" अगदीं चिडून जाऊन घनश्याम म्हणाला. "आपलीं मुलं सुसंपन्न

नागरिक कशीं होतील हें पहाण्याचें, सुशिक्षित माता, या दृष्टीनें तुझं कर्तव्य नव्हतं वाटतं ? आणि शिवाय मुलं सुदृढ, सुजाण व सुशील व्हावीं म्हणून आईनं चोवीस तास त्यांच्या भोंवतीं कपाळ घांशीत राहाण्याची जरूर आहे, असें नाहीं मला वाटत. सुशिक्षित, शहाणी आई थोडयाशा दक्ष देखरेखीनें हें सगळं उत्तम करवून घेईल, अशी खात्री आहे मला. लांब कशाला. शेजारचा शरद् दुबळा, मूर्ख किंवा उनाड निघाला असें म्हणायला तयार आहेस तूं ? त्याची आया, त्याच्या आईच्या देखरेखीखालीं मुलांची निगा, मला वाटतं, तुझ्यापेक्षां सुद्धां चांगली राखते. "

शालिनीबाईच्या मनाला अपमानाच्या इंगळया लागल्या. काय बोलावें तें त्यांना सुचेना. भ्रमिष्टासारख्या त्या एकदम म्हणाल्या,

शरद्‌चा व त्याच्या भावंडांचा त्यांच्या आयावरच जास्त जीव आहे. आईवर मुळींच नाहीं. मला नसतं आवडलं असं. "

" स्वार्थी कुठली ! " भान विसरून एकदम बेफामपणें श्याम ओरडला. मुलाबाळांच्या खस्ता स्वतः अंग झिजवून खाल्ल्या, म्हणजे मुलं कृतज्ञता-बुद्धीनें आपल्यावर जास्त प्रेम करतील, व म्हातारपणीं उपयोगीं पडतील, या स्वार्थबुद्धीनेंच केलेंस ना तूं हें सारं ? पण खात्री बाळग, तुझ्याविषयीं मला वाटत असलेलं सारं प्रेम आतां जळून खाक झालं आहे. स्वतःला आदर्श माता म्हणून मिरवतां यावें, यासाठीं बाबांना आणि आम्हांला तूं दारिद्र्यांत लोटून दिलंस ! मुलांनीं स्वतःवर प्रेम करावं, या स्वार्थबुद्धीनें, तूं आमच्या भावी सुखांवर, महत्त्वाकांक्षांवर निर्दयपणें पाणी ओतलंस ! ! आई कसली, तूं पूर्वजन्मींची वैरीण आहेस वैरीण ! ! ! "

संतापानें घनश्यामानें आपले दांत कडकडा चावले; बिचाऱ्या दुर्दैवी शालिनीबाई, नशिबाला हात लावून, वेडयासारख्या बसून राहिल्या होत्या.

## ‘ आशाभंग ’ ३

चित्रपटगृहांतले विजेचे पंखे भराभर फिरूं लागले; सुरेल संगीतानें सारें चित्रपटगृह निनादित होऊन गेलें. फिल्म सुरू होण्याला सारीं दहा मिनिटें राहिलीं. बॉक्समध्यें कोचावर मागें रेलून पडलेल्या चंद्रकांतानें डोळे किलकिले केले; कठड्यावर पुढें वांकून त्यानें साऱ्या थिएटरभर नजर फिरविली. “ लव्हपरेड ” सारखें लोकप्रिय पिक्चर आणि फार दिवसांनीं पुन्हा आलेलें ! त्यामुळें साहजिकच चित्रपटगृह गुलहौशी तरुणतरुणींनीं गजबजून गेलें होतें. त्यांच्या येण्याबसण्यांतली लगबग, त्यांच्या प्रसन्न वृत्तींतून उडणारे हास्यविनोदाचे फवारे—यांनीं चंद्रकांताला कांहींसा हेवा, कांहींसा उबग वाटला. पुन्हां डोळे मिटून कोचाच्या पाठीवर तो रेलून पडला. थिएटरमधील आनंदी जमाव त्यानें डोळ्याआड केला. पण शेजारच्या बॉक्समधील मंजुळ कूजन व लोभनीय नाद यांनीं तो अधीर व कावराबावरा झाला. मनगटावरल्या घड्याळाकडे नजर टाकीत तो उद्गारला,

" काय बुवा. सुहासनं फारच उशीर केलान्! ती असं करायची नाहीं कधीं!"

त्यानें पुन्हां डोळे मिटून घेतले; त्याच्या मिटलेल्या डोळ्यांपुढें सुहास दिसूं लागली. दुसऱ्याच दिवशीं, सुहास त्याची, अगदीं पूर्ण त्याची, होणार होती! पण, मुग्ध प्रणयाचा, चोरट्या सहवासाचा, शेवटचा गोड घास आज या पिक्चरच्या निमित्तानें घेण्याचें उभयतांनीं ठरविलें होतें. अनेक कामें बाजूस मारून, आज थिएटरवर येण्याचें, सुहासनें अभिवचन दिलें होतें. अजून तिचा पत्ता नव्हता!

पटकन थिएटरमधले दिवे विझले, संगीत मृदु झालें; समोरचा निर्विकार रुपेरी पडदा, नानाविध रूपानें नटूं नाचूं लागला. चंद्रकांताच्या डोळ्यांसमोर देखावे येतजात होते; पण मन कांहींच ग्रहण करूं शकत नव्हतें!

" कां बरं झाला असेल सुहासला उशीर?" तो मनांत विचार करीत होता. " तिच्या आईनं अगदीं निघण्याच्या वेळीं एखादें सुंदर पातळ किंवा एखादी किंमती ' ब्रूच ' निवडण्यासाठीं तिला हांक मारली असेल; नाहींतर एखादी मैत्रीण थट्टामस्करी करीत वेळ खात बसली असेल! कदाचित् आयत्यावेळीं मोटर पंक्चर झाली असेल; व गाडी आणीपर्यंत वेळ मोडला असेल!"

अशा कितीतरी कल्पना चंद्रकांताच्या मनांत येऊन गेल्या. दहा मिनिटें झालीं; वीस मिनिटें; अर्धा तास!

चंद्रकांताच्या मनाबरोबर त्याच्या शरीराचीहि अस्वस्थता वाढत होती. केसमधून एकामागून एक सिगरेट्स् काढून तो ओढूं लागला; व अर्धवट पेटल्याच फेंकून देऊं लागला.

एक तास झाला; चंद्रकांत धाड्कन बॉक्सचें दार उघडून बाहेर पडला व गॅलरींत इकडून तिकडे येरझारा करूं लागला.

" हं. असंच असेल "—नवीन एक कल्पना मनांत येऊन चंद्रकांत उद्गारला. बॉक्समधील आपली हॅट व काठी घेऊन भराभर जिना उतरून चंद्रकांत

खालीं आला. क्षणार्धात, पार्क केलेल्या गाड्यांतून त्यानें आपली गाडी बाहेर घेतली, व रस्त्यानें भरधांव सोडली.

सुहासच्या न येण्याचें कारण उमगल्यामुळें त्याचें मन जरा मोकळें झालें व “ नाचो नाचो ” चे सूर शीळेंतून नकळत उमटूं लागले.

सुहासचा बंगला थिएटरपासून बऱ्याच अंतरावर होता. अर्धे अंतर तोडी-पर्यंत चंद्रकांत खुषींत होता, पण नंतर त्याचें मन पुन्हां अस्वस्थ होऊं लागलें.

छे, लखनौच्या मामांची सुहास कितीहि जरी लाडकी असली, तरी आजचा मधुर संकेत–केवळ अनपेक्षितपणें रजा मिळून लग्नाला मामा हजर झाले, या आनंदांत सुहास साफ मोडील ? शक्य नाहीं ! दूरच्या प्रवासानें शिणून आलेल्या मामांच्या स्वागतांत, पहिल्यांदा नाहीं म्हणून तार करून नंतर अचानकपणें ते आल्याच्या आश्चर्यानंदांत सुहास फार तर अर्धा पाऊण तास गढून जाईल ! पण नंतर, कांहींतरी शक्कल काढून, थिएटरवर धांवत आल्याशिवाय ती कधीं राहिली नसती !

चंद्रकांतचें मन पुन्हां अधीर, अस्वस्थ झालें.

‘ हो, विसरलोंच होतों मी ’ एका खेडवळाला टाळण्यासाठीं कर्कश आवा-जांत ब्रेक दाबीत, चंद्रकांत पुटपुटला. ‘ तिच्या मॉंटेसरी क्लासमधला तो छोकरा–त्याचं जास्त तर झालं नसेल ? ’

चंद्रकांतनें बंगल्याच्या फाटकाबाहेरच मोटार उभी केली व ‘ शुत् शुत् ’ करून माळ्याला जवळ बोलावलें.

“ ताईसाहेब आहेत का रे ? ”

“ हो, साब, हैती; वर्दी देऊं जनु ? ”

हीं प्रश्नोत्तरें माळ्याला आज किती दिवस तोंडपाठ झालीं होतीं. पण चंद्र-कांतनें प्रश्न विचारल्यावरोबर त्याच्या तोंडावर उमटणारें नेहमींचें कौतुकाचें, कांहींसें मिस्किल हसूं व वर्दी देण्याची लगबग याचा मात्र मागमूस आज त्याच्या चेहेऱ्यावर नव्हता.

चंद्रकांतचें आशंकित मन जास्तच साशंक झालें.

" कारे, ताईसाहेबांची तबियत तर ठीक आहे ना ? "

" हां, हां, तबियत तशी ठीक हाय; पन् जिवाला ग्वाड नाय्, अक्षी उदास झाल्याती—"

" *कां बरं ? काय झालं रे ?* " अधीरपणें चंद्रकांतनें विचारिलें.

" *त्याचं असं झालं, पघा, साब* " माळी पाल्हाळानें सांगूं लागला. " तो इस्कुलांतला पोरगा–शीक होता तो–तो लईच वंगाळ झाला सकाळपुन्–अख्वा दिवस ताईसाब त्येच्याच घरीं व्हत्या आज पन् असं सांजच्या पारीं दगावलं पोरगं—"

माळ्यानं तोंड वाईट केलं; चंद्रकांतच्या छातींत एकदम धस्स झालें.

" ताईसायबांचं त्वांड अक्षी चिमणीवानी झालंया; अन् डोलं ह्यो अस्सं मुठीवानी रडूनरडूनशान् ! खानं नाय्, पिनं नाय्, खोलींत बंद होऊनशान्, बिछान्यावर पडल्याती जनुं—"

" अस्सं " चंद्रकांत उद्गारला. त्याला वाईट वाटलें खरेंच, पण विवाहपूर्व दिवशींच्या सहवासाचा अपूर्व आनंद लुटण्याच्या आड आलेल्या त्या छोकऱ्याचा त्याला जरासा रागच आल्यावांचून राहिला नाहीं !

" अच्छा, जातों तर मी " फर्‌्कन् मोटार सुरू करीत तो म्हणाला, " उद्यां— "

" हां, उद्यां तर साब "–माळ्याचें तोंड हर्षानें फुललें व आपले शुभ्र दांत दाखवीत तो मनापासून हंसला.

त्याच्या त्या तोंडभर हसण्याची, कां कोण जाणें, चंद्रकांतला चीडच आली एकदम. त्रासिकपणें, आपल्या घराकडे त्यानें भरधांव मोटार सोडली. जवळजवळ दीडदोन तास कंटाळवाणे, अधीरतेनें काढले होते त्यानें;–व शेवटीं निराशाच आली त्याच्या वांटणीला !

" बस्स " एक मोठी जांभई देत, कपाळावर हात फिरवीत, तो म्हणाला, " घरीं गेल्यावर ऐऽशी ऽ ताणून देतो आतां. "

  

सकाळचा सोनेरी सूर्यप्रकाश त्याच्या खिडकींतून आंत आला. तेव्हां चंद्र-कांतनें गाढ व दीर्घ झोपेनें जड झालेले आपले डोळे किलकिले केले; आणि एकदम त्याच्या शरिरावर एक आनंदाची लकेर फिरून गेली.

“ आज आपला लग्नदिवस ! आज सुहास आपली होणार ! ”

अंगावरला रग फेकून देऊन त्यानें पलंगाखालीं उडी टाकली, पायांत खडावा घालून स्नानगृहाकडे “ मंगल दिन हा आजि उदेला ” असें गुणगुणतच तो निघाला. टॉवेलनें हात–तोंड पुशीत पुशीत तो खोलींत परत आला. त्यानें खोलीभर नजर फिरविली. किती सुंदर दिसत होती प्रत्येक गोष्ट आज. भिंतीवरला सूर्यकिरणाचा कवडसा, कपाटांतील एकमेकांना लगटून उभीं असलेलीं पुस्तकें, स्टॅंडवर एकमेकांच्या गळ्यांत गळा घालून ठाकलेल्या छत्र्या-काठ्या, व हॅट्स्, नोकरानें टीपॉयूवर आणून ठेवलेलीं चहाचीं उपकरणें–प्रत्येक वस्तूंत कांहींतरी जादू भरली होती आज—

प्रसन्न मुद्रेनें चंद्रकांतनें चहा बनविला व त्याचा पहिला मधुर घोंट घेत त्याच्या आस्वादानें समाधान पावून डोळे मिटले—

इतक्यांत त्याच्या टेबलावरची फोनची घंटा खणाणून वाजली. चंद्रकांत एकदम दचकला. एकच घोट घेतलेला तो लोभनीय चहाचा प्याला त्यानें नाखुषीनें खालीं ठेवला व कांहींशा रुष्टतेनें “ हॅलो ” म्हणून रिसीव्हर कानाशीं लावला.—

आणि चंद्रकांतची मुद्रा एकदम पालटून गेली !

“ कोण विश्वनाथ ? तुमच्या बंगल्यावरूनच बोलतो आहेस ना तूं ! काय; काय म्हणतो आहेस सुहासबद्दल–काऽय ? ”

बोलतां बोलतां चंद्रकांतची बोबडी वळल्यासारखी झाली. रिसीव्हर त्याच्या हातांतून गळून पडला. त्याचें शरीर, डोळे, ताठरल्यासारखे झाले. दुसऱ्याचक्षणीं जवळच्या खुर्चीवर तो पट्कन् बसला.

“ खण्खण्खण् ” फोनची घंटा वाजतच होती. पण चंद्रकांतला ती ऐकूं येत नव्हती ! ऐकूं येऊनहि, रिसीव्हर घेण्याचें सामर्थ्य हातांत नव्हतें !

त्याचीं सारीं गात्रें बधिर झालीं होतीं. दोन्ही हातांनीं मस्तक घट्ट धरून, वेड्यासारखा तो खोलीभर भिरीभिरी पहात होता !

साऱ्या वस्तु, क्षणापूर्वी होत्या तशाच आहेत ! चहाच्या प्यालांतून मगासारखीच गिरकी घेत, वाफ वरवर नाचत जात आहे ! पुष्पपात्रांतील फुलें, मगासारखींच, ताजीं टवटवीत आहेत ! प्रभात वायूच्या मंद झुळुकीला, खिडकीवरला पडदा नाजूकपणें अंगचाळवीत मगासारखीच साथ देत आहे ! आणि सुहास,–सुहास मात्र आतां या जगांत नाहीं.–कसं शक्य आहे हें ?

अशाच जडमूढ स्थितींत चंद्रकांत तेथें कितीवेळ तरी बसला होता.

दाराशीं मोटार थांबली; जिन्यावर पावलें वाजलीं; दारावर टक्‌टक् टिचक्या वाजल्या. तरी चंद्रकांत जागचा हलला नाहीं.

शेवटीं दार ढकलून विश्वनाथ आंत आला; तेव्हां मात्र शुद्धीवर आल्यासारखें चंद्रकांतनें त्याच्याकडे पाहिलें व एक कोरडा हुंदका त्याच्या तोंडांतून बाहेर पडला !

विश्वनाथनें खिशांतून एक पाकीट काढलें व आपले अश्रु लपवीत आवाज शक्य तेवढा स्थिर ठेवीत, चंद्रकांतला म्हटलें,

" हें ताईच्या खोलींत टेबलावर सांपडलं. तुमच्या नांवावर आहे तें. उघडून वाचा हो , म्हणजे तरी उलगडा होईल कांहीं—"

पुढें बोलवेना त्याच्यानें. त्यानें पाकीट पुढें केलें. एखाद्या यांत्रिक बाहुल्याप्रमाणें चंद्रकांतनें तें त्याच्या हातांतून घेतलें, फोडलें.

चिरपरिचित अशीं तीं प्रिय अक्षरें नजरेस पडतांच, चंद्रकांत कावराबावरा झाला; पण प्रयत्नानें त्यानें मनाचा तोल सांवरला; डोळे टिपणाऱ्या विश्वनाथाला खालीं बसण्याची हातानें खूण करून, तो पत्र वाचूं लागला.

" प्रिय चंद्रकांत. " सुहासनें लिहिलें होतें—

" हें पत्र तुमच्या हातांत पडेल, तेव्हां मी जगांतून नाहींशी झालेली असेन. माझ्या या अकल्पित अचानक आत्महत्येचें कारण, ' क्षणिक वेडाची लहर ' असें कदाचित् ठरविलें जाईल; तें कांहींहि होवो; पण माझ्या आक-

ऽिमक आत्मघाताचें खरें कारण व इतिहास तुम्हांला साद्यंत सांगितल्या-शिवाय मी या जगाचा निरोप घेणें योग्य होणार नाहीं. चंद्रकांत, घ्याल ना माझीं कारणें नीट समजावून नि पटवून ? विक्षिप्त, लहरी म्हणून हिणवून माझा आत्मघात तुम्ही व्यर्थ करणार नाहीं ना ?

कांत, उद्यां आपला लग्नदिवस ! आपल्या वैवाहिक जीवनाबद्दल किती किती आशा, आकांक्षा तुम्ही आणि मीसुद्धां हृदयाशीं बाळगून ठेवलेल्या असतील ! तें वैवाहिक जीवन उद्यां सुरू होणार ! आणि त्याच्या कमी-जास्ती यशस्वितेवर तुमचें–आणि माझें—साऱ्या जन्माचें सुखःदुख अव-लंबून राहणार !–या विचारानें आज कातर झालें आहे माझें मन ! मी–तुमच्या, माझ्याविषयींच्या साऱ्या आशा, आकांक्षा पुऱ्या करूं शकेन का ? कां आपली निवड चुकली म्हणून आशाभंगाचें दारुण दुःख साऱ्या जन्मभर सहन करावें लागेल तुम्हांला माझ्यामुळं !

कांत, माझ्या लहानपणासूनच्या साऱ्या आयुष्यावर, आज या महत्त्वाच्या रात्रीं, मला एकवार नजर टाकावीशी वाटते. सुशिक्षित, संपन्न म्हणून ' एक सुखी स्त्री ' म्हणून कौतुकानें लोक कदाचित् माझ्याकडे बोट दाखवीत असतील ! पण बाहेरून सुखी व पूर्ण दिसणाऱ्या या माझ्या जीवनाला, लहानपणापासून मधून–मधून कीड लागत गेली आहे. माझ्या प्रेमाच्या, जिवाच्या, जिव्हाळ्याच्या माणसांनीं माझ्याबद्दल ज्या ज्या आशा–आकांक्षा बाळगल्या त्या त्या मी कधींच पुऱ्या करूं शकलें नाहीं !—

फार कशाला, या जगांत मीं प्रथम प्रवेश केला तोच माझ्या जन्मदा-त्रीच्या आशांना जबर धक्का देऊन ! आपल्याला पहिला वहिला मुलगा व्हावा अशी आईला फार इच्छा होती. साहजिकच होतें तें. कांत, तुमच्यापासून कशाला लपवून ठेवूं ! बाबांनीं आईला फारसें सुख कधींच दिलें नाहीं–माझ्या जन्मापूर्वींहि दिलें नसावें. आपल्या सुखसोईंना, चैनीला आवश्यक अशी एक आपली हक्काची चीज, म्हणून ते तिला जपत, तिला कांहीं कमी पडूं देत नसत ! पण जिवाची सखी, जन्माची जोडीदार म्हणून जिव्हा-

ळ्यानें त्यांनीं तिला कधीं वागवलें नाहीं. भिन्न भावानांचें, भिन्न आवडी-निवडी असूं शकलेलें एक माणूस, म्हणून माणुसकी त्यांनीं कधीं दाखवली नाहीं, बायकोच्या व्यक्तित्वाची, तिच्या मानवतेची दखल न करणारा नवरा असला म्हणजे बायकांचा सारा जीव मुलांवर, विशेषतः पहिल्या मुलावर जडून जातो. आणि तें पहिलें मूल जर नशिबानें मुलगा असला तर मित्रत्वाच्या सहजीवनाची, आपुलकीच्या मनमिळणीची, जिव्हाळ्याच्या आणि खेळीमेळीच्या रम्य जीवनाची बायकांची हौस पुरी होते. म्हणून, माझ्या आईनें माझा पहिला टाहो ऐकतांच, ' काय झालं ! ' म्हणून उत्सुकतेनं, शरीराच्या त्या अविकल, असहाय स्थितींतही प्रश्न केला. आणि, ' मुलगी ' असें नर्सचें उत्तर ऐकतांच तिच्या जिवाशीं बाळगून ठेवलेल्या साऱ्या आशांचा चक्काचूर झाला !

मोठेपणीं आईच्या तोंडून ही हकीकत ऐकली तेव्हां माझ्या मनांत आलं, ' देवा, कशाला जन्माला घातलंस तूं मला ? जन्मदात्रीच्या आशेला लाथाडून जगांत प्रवेश केलेली मी मुलगी—ज्यांच्या ज्यांच्याशीं माझा जिव्हाळ्याचा संबंध येईल, त्यांच्या त्यांच्या आशा, आकांक्षांना अशीच लाथाडीत तर जाणार नाहीं ना मी. '

आणि तसंच होत गेलं पुढें, कांत !

एक क्षुल्लकशी शाळेंतली गोष्ट. पण अजून काल घडल्यासारखी स्पष्ट आठवते ती मला.

आमची इन्स्पेक्शन् होती. आमचे आवडते गणिताचे मास्तर म्हातारे झाले होते व त्यांना सेवानिवृत्त करण्याची सोसायटीची इच्छा होती. मास्तरांचा प्रपंच मोठा—सेवानिवृत्त होऊन त्यांचें कसें भागणार होतें ! आपली नोकरी चालू राहावी म्हणून त्यांनीं पुष्कळ खटपट केली, वशिले लावले. शेवटीं त्यांच्या हाताखालच्या वर्गाची इन्स्पेक्शन् घेऊन, त्यांच्या शिकवण्याच्या लायकीची परीक्षा करावी, व तीवर त्यांची नौकरी चालूं राहणें अवलंबून ठेवावें, असें ठरलें.

करडे म्हणून प्रसिद्ध असलेले इन्स्पेक्टर आमच्या वर्गावर आले. पहिल्या सपाट्यास, अतिशय किचकट असें उदाहरण त्यांनीं आमच्या वर्गाला घातलें.

त्या दिवशीं सकाळपासूनच अगदीं सचिंत दिसत होते मास्तर. तें उदाहरण ऐकतांच त्यांचा चेहरा अगदींच मालवून गेला. धीर करून इन्स्पेक्टर साहेबांच्या खुर्चीजवळ ते गेले व नरमाईच्या अजीजीच्या स्वरानें म्हणाले, “ या यत्तेच्या सर्वसाधारण विद्यार्थ्याला सुटण्याजोगं आहे हें उदाहरण, असें वाटतं आपल्याला ? ”

मास्तरांकडे तुच्छतेनें पाहून साहेब हंसले व मान हलवीत म्हणाले, “ निदान या वर्गाच्या मुलींना हें उदाहरण सुटेल असें कांहीं लक्षण दिसत नाहीं मला. ”

त्यांच्या वाक्यांतील खोंच मास्तरांना झोंबली.

साहेब पुढें म्हणाले, “ पण तें जाऊं दे मास्तर. या वर्गातल्या एका मुलीनें जरी हें उदाहरण बरोबर केलें तरी तुमच्या शिक्षणपद्धतीला शेंकडा साठ मार्क देईन मी. ”

आतां मास्तरांचा जीव जरा खालीं पडल्यासारखा दिसला. त्यांची नजर माझ्याकडे वळली. वर्गातली सगळ्यांत बुद्धिमान् मुलगी मी. माझ्या तल्लख बुद्धीला तें उदाहरण सुटल्याशिवाय राहणार नाहीं, अशा खात्रीनें ते खिडकींत जाऊन बसले. माझ्याकडे आणखी एकदां सस्मित पाहून, ते एक पाय हलवीत, साहेबांकडे नजर लावून बसले.

पांच मिनिटें झालीं, दहा झालीं. साऱ्या मुली त्या उदाहरणाशीं झटपटत होत्या. एकीनेंहि उभें राहून उदाहरण पुरें झाल्याचें दर्शविलें नाहीं.

साहेब उठले. डेस्कांच्या रांगांमधून प्रत्येक मुलीच्या वहीकडे नजर टाकीत, ते फिरूं लागले. सगळ्या मुली आंकड्यांच्या चक्रव्यूहांत घोटाळत होत्या. साहेब परत टेबलाजवळ गेले. मास्तरांकडे नजर टाकीत, ते मोठ्यानें म्हणाले,

" काय, नाहीं सुटत कुणाला हें ? काढा आतां मग मराठीचीं पुस्तकें. "

मास्तर लगबगीनें उभे राहिले; आणि म्हणाले,

" त्या, त्या मुलीचें पाहिलें नाहीं तुम्हीं अजून. ती बरोबर करील. सुहास, " त्यांनीं मला हांक मारिली.

मीं मान वर केली नाहीं. अश्रूंनीं माझे डोळे डबडबले होते. एकमेकांत गुरफटून मला गोंधळून टाकणाऱ्या वहीवरल्या मुदल व्याजाकडे मी, हतबुद्ध होऊन, पहात होतें.

आतां मात्र मास्तर बावरले; माझ्या डेस्कजवळ येऊन, माझी वही हातांत घेऊन कापऱ्या आवाजानें ते म्हणाले,

" तुला सुद्धां सुटलें नाहीं हें उदाहरण, सुहास ? "

वहीवरल्या, सतरा ठिकाणीं खोडलेल्या गिरमिट आंकड्याकडे एकवार नजर टाकून त्यांनीं वही मिटून खालीं ठेवली. साहेबाकडे वळून ते म्हणाले " होऊं दे मराठीची इन्स्पेक्शन सुरू आतां; मराठीच्या शिक्षकांना पाठवून देतों मी. "

मास्तर मंदमंद पावलें टाकीत वर्गाबाहेर गेले. त्यांचा चेहरा अगदीं काळवंडून गेला होता. गेल्या दहा मिनिटांत ते जसे कांहीं जास्तच वृद्ध होऊन खंगून गेले होते.

आशाभंगानें खिन्न झालेली त्यांची ती दुबळी मूर्ति,—बाहेर जातांना त्यांनीं वर्गाकडे—आणि मला वाटलें, विशेषतः माझ्याकडे,—टाकलेली केंविलवाणी नजर—माझें हृदय कापीत गेली, मला रडूं कोसळलें.

' देवा ' मीं मनाशीं म्हटलें, ' माझ्या आवडत्या माणसांचा हिरमोड व्हावा, हेंच माझ्या नशिबीं लिहिलें आहेस कारे तूं ! '

कांत, असे कितीक प्रसंग लिहूं ? ते सगळे आतां माझ्या स्मरणांत सुद्धां नाहींत; पण त्यांनीं माझ्या मनाची घडण घडली ती मात्र कायमची. जीवनाविषयीं, प्रियजनांबरोबर जाणाऱ्या माझ्या भावी जीविताविषयीं, एक प्रकारची कातरता कायमची माझ्या मनांत ठाणें देऊन बसली—

*आणि आजचा तो प्रसंग–त्यानें माझ्या कातरतेला परिसीमेला पोंचवली ! आणि ही घटनाहि घडली ती आजच, माझ्या विवाहपूर्वरात्रीं !*

माझ्या मॉंटेसोरीस्कूलमधला तो गोड छोकरा–त्याच्याविषयीं पुष्कळदां बोललें असेन मी तुझ्याजवळ. आज वर्षभर मी त्याला पाहात आहें. मला सगळींच मुलें फार आवडतात. पण या गोरावर माझा पहिल्यापासूनच फार जीव जडला आणि त्याचें कारण त्याचा लाघवीपणा. तसा तो फार दांडगा, हट्टी आहे पण माझ्याकडे त्याचा पहिल्या दिवसापासूनच, कां कोण जाणे, फार ओढा, फार भक्ति. कुणाचें ऐकायचा नाहीं तो. पण मी ठोकळे घे म्हटलें कीं ठोकळे घ्यायचा. मातीचें काम म्हटलें कीं मातीचें काम. माझ्या एका शब्दाबाहेर कधीं जायचा नाहीं. मला खूष करायसाठीं वाटेल तें करायला, सोसायला तयार असायचा. ताई सांगतील तें बरोबर असणार, अशी त्याची अगदीं दृढश्रद्धा असलेली दिसावयाची. साहजिकच मला तो जास्त जास्त आवडूं लागला, मी त्याला सुट्टीच्या दिवशीं घरीं बोलावीं; मोटरमधून फिरायला, सिनेमाला नेईं. तऱ्हेतऱ्हेचीं खाऊ खेळणीं पुस्तकें त्याच्यासाठीं घेईं. आमचा विश्वनाथ त्याला थट्टेनें ‘ घरजांवई ’ म्हणे.

आतांशा मात्र, आपल्या लग्नाच्या तयारीच्या गडबडींत मी त्याला जराशी विसरलें होतें बहुतेक. कारण तीनचार दिवस तो शाळेंत आला नाहीं तरी ती गोष्ट माझ्या फारशी लक्ष्यांत आली नाहीं. पण एक दिवस भर बारा वाजतां त्याची आई, डोळे टिपीत, माझा शोध करीत शाळेंत आली. तेव्हां मला एकदम धक्का बसला, पश्चातापाचा.

फार आजारी होता चिमणा किशा. त्याची आई, त्याला योग्य तें औषधपाणी यथास्थित करीत होती. पण किशा सारखा, “ ताईचा ” ध्यास घेऊन बसला होता ! थोरामोठ्यांची मुलगी मी, शिवाय शिकलेली,–निरोपावारी कशी येईन ?—म्हणून त्याची आई स्वतः मला घरीं घेऊन जायला आली होती.

त्याची आई, स्फुंदत सांगूं लागली, “ म्हणतो, मला ताईच्या शाळेंत नाहीं तर, ताईच्या घरीं, त्यांच्या खोलींत नेऊन निजव; म्हणजे मी बरा

होईन. तुझ्या डॉक्टरच्या औषधानं नाहीं बरा व्हायचा मी. माझ्या ताईंनीं माझ्या अंगावरून हात फिरविला, म्हणजे माझं दुखायचं थांबेल!"—

माझ्या डोळ्यांना पाणी आलें. ताबडतोब मीं मोटार बोलावली आणि किशाच्या आईबरोबर त्याच्या घरीं गेलें.

किशाला झोंप लागली होती. चार दिवसांच्या तापानें सुकून गेलें होतें पोर. गुबगुबीत गालांवर, वेदनांचीं काळीं पाउलें उमटलीं होतीं. माझी चाहूल त्याला झोपेंतसुद्धां लागली जशी कांहीं; त्यानें एकदम डोळे उघडले. त्याचे ते नेहमींचे मस्त गुलाम डोळे अगदीं निस्तेज झाले होते आज. पण तरी सुद्धां, माझ्याकडे नजर जातांच, तशाहि स्थितींत त्याचे डोळे, आनंदानें लकाकूं लागले. खोल आवाजांत, पण हुरूपानें तो म्हणाला,

"ताई, आलां तुम्ही? आतां मी बरा होईन."

त्या दिवसापासून त्याची शुश्रूषा मी माझ्या हातांत घेतली. त्याच्यापासून दूर होऊन घरीं यायचेंसुद्धां माझ्या जिवावर येई. तोहि मला सोडायला अगदीं नाखूष असे. "ताई, तुम्ही जवळ असलां, म्हणजे माझं कमी दुखतं" असं दीनवाण्या मुद्रेनें म्हणायचा तो.

पण हें 'कमी दुखणं' फार दिवस टिकलं नाहीं. किशाचें दुखणें जबर होतें. जरा बरें झाल्याची हुलकावणी दाखवून दुप्पट जोरानें काल सकाळ-पासून त्यानें चिमण्या किशावर हल्ला चढवला.

लहान मुलांचा काळ न्युमोनिया, त्याच्या छातीवर बसला होता. त्याच्या यातना, तळमळ आम्हांला पाहावेना? किशा श्वासासाठीं धडपडूं लागला कीं आमचीं काळजं तडफडूं लागत.

आणि आशेनें, खात्रीनें, यातना कमी होण्यासाठीं किशानें माझा हात घट्ट घट्ट धरला कीं माझ्या असहायतेचा मला तिटकारा येऊन जाई.

तो पुन्हां पुन्हां म्हणे, "ताई, या इथं दुखतं; इथं तुम्ही हात ठेवाना, म्हणजे बरं होईल तें."

कसं होणार बरं, किशा, तें ? निदान या तुझ्या ताईच्या हातून, तर कध्धीं, कध्धीं, नाहीं !

त्याच्या बिछान्यापाशीं बसून तळमळण्यापलीकडे मी कांहीं करूं शकलें नाहीं. किशा पुन्हां पुन्हां, आपले झांपड येत असलेले डोळे प्रयत्नानें उघडी व माझ्याकडे आशेनें नजर लावी. एकदां तब्बल अर्धा तास श्वासासाठीं झगडल्यावर, माझा हात घट्ट धरून, तो मोठ्या कष्टानें म्हणाला,

‘ ताई ! मरेन का हो मी आतां ? ’

डोळ्यांतील पाणी परतवीत, मीं जोरानें मान हलवली.

‘ ताई, ’ तो पुन्हां ओठावर जीभ फिरवीत म्हणाला, ‘ तुम्ही मला मरूं देऊं नका. नाहीं ना देणार ? ’

मी पुन्हां मान हलवली; माझा हुंदका बाहेर पडला. माझा शहाणा किशा, जरा वेळानें पुन्हां डोळे उघडून म्हणाला,

‘ ताई, तुम्ही पण रडतां ? आई पण रडते ! रडूं नका ताई ! मी मरायचा नाहीं—तुम्ही मला कसं मरूं द्याल ? ’—

आणि शेवटीं काल संध्याकाळीं किशानें या जगांतून प्रयाण केलें. त्याची आशापूर्ण, याचनेनें भरलेली, विश्वस्त नजर शेवटपर्यंत माझ्यावर खिळली होती !

कशी विसरेन मी ती नजर !

मी घरीं आलें; खोलींत स्वतःला कोंडून घेऊन रडलें; आणि माझ्या कातरतेनें भीषण स्वरूप धारण केलें.

आशाभंग ! छोट्या किशाचा केवढा भयंकर आशाभंग केला मीं. सगळ्या नडींतून इतके दिवस आपल्याला निभावून नेणाऱ्या ताई, आपलें दुखलें खुपलें नेहमीं बघणाऱ्या ताई—आपल्याला या यातनांतून वांचवतील, मरूं देणार नाहींत, अशा दृढ श्रद्धेनें मला बिलगलेला तो चिमणा जीव.—त्याला मी वाचवूं शकलें नाहीं ! त्याच्या यातना किंचित् अंशानेंहि मी कमी करूं शकलें नाहीं !

असे किती, आणि कुणाकुणाचे दारुण आशाभंग व्हायचे आहेत माझ्या हातून !

कांत, तुझी मूर्ति नजरेसमोर आली, आणि माझ्या काळजानें ठाव सोडला. माझ्या कान्ताचा आशाभंग करण्याचें माझ्या नशिबीं आलें तर !

काळजाचे असे जन्मभर तुकडे तुकडे करीत बसण्यापेक्षां एकदांच ' एक घाव दोन तुकडे ' केले तर ?

कांत, आज मी तुझा आशाभंग करीत आहें. तुझ्या विवाहाच्या सुप्रभातीं तुझ्या लाडक्या सुहासची मृत्युवार्ता तुझ्या कानीं येणार ! केवढा भयंकर आशाभंगाचा धक्का आहे हा ! माझा जन्म प्रियजनांच्या आशाभंगांत झाला आणि शेवट त्याहूनहि भयंकर अशा आशाभंगानें होणार ! पण कांत, हा मी तुझा करीत असलेला भयंकर आशाभंग पहिला तसा शेवटचाच ठरेल –एवढ्याच आशेनें मी हें आत्मनाशाचें साहस करीत आहें.

क्षणोक्षणीं तुझ्या आशाभंगाला कारण होऊन तुला व मला क्षणोक्षणीं दुःखी करण्यापेक्षां,–आत्यंतिक यातना एकदांच सोसलेल्या व तुला दिलेल्या, इष्टतर नाहींत का ? आशाभंगाच्या पडद्यानें एकमेकांपासून हळुहळू दुरावत जाणारे सहजीवन, आयुष्याच्या अंतापर्यंत कष्टानें घटका मोजीत जगण्यापेक्षां, झटक्यासरसें कायमचें दुरावलेलें, सह्यतर नाहीं का ? शरिराचा एक अवयव दूषित व घातक आहे असें एकदां ठरल्यावर, खोट्या मायेनें त्याचा एकएक तुकडा रोज कानशीत बसण्यापेक्षां निष्ठुरपणें त्याला शरीरापासून एकदम अलग करणें, जास्त दयाळुपणाचें व शहाणपणाचें नाहीं काय ?

कांत, दे निरोप आतां ! तुला फार, फार दुःख होईल; पण कालांतरानें तें विसरशील तूं; व परिणामीं जास्त सुखकर अशी जोड जोडून सुखी होशील. तुला हें आतां शक्य वाटणार नाहीं; मीं असें लिहावें, हें सुद्धां तुला उलट्या काळजाचें वाटेल; पण, कांहीं काळ लोटल्यावर मी म्हणतें तसें घडून येईलच व तें लवकर घडून येवो, हीच माझी ईश्वरापाशीं शेवटची प्रार्थना आहे.

कांत क्षमा कर मला; केलीस ना ?

  

आई, बाबा, विश्वनाथ, तुमची क्षमा मी कोणत्या तोंडानें मागूं? मी तुमची मोठी अपराधी आहें! मी तुम्हाला विनाकरण दुःखांत लोटीत आहें, असें तुम्हाला वाटेल; पण काय करूं मी? आत्मघात न करतां, कांतला दुखवून, लग्न मोडूं? त्यानें मी जन्माची दुःखी होईन व तुम्हां सर्वांना दुःखी करीन. कांतच्या काळजाची जखम तर, मी जिवंत त्याच्या डोळ्यासमोर वावरत असतांना कधींहि भरून येणार नाहीं!

छे, दुसरा विचारच नको! प्रथम ठरला तो निश्चयच उत्तम! 'सुहास'

  

चंद्रकांतनें पत्र वाचून टेबलावर ठेवलें. आपली मनोवृत्ति आवरण्याचा त्यानें आटोकाट प्रयत्न केला; पण तो न चालून 'सुहास, सुहास' असा चित्कार त्याच्या तोंडून बाहेर पडला व दोन्ही हातांनीं त्यानें आपलें तोंड झांकून, मोठमोठे हुंदके दिले.

## 'सुख' ४

" कसला विचार चाललाय् एवढा ! बोलायचं नाहीं का ? "

सरस्वतीनें विचारलें. आगगाडीच्या घडघडण्यांत नीट ऐकूं गेलें नसेल म्हणून तोच प्रश्न तिनें आणखी एकदां मोठ्यानें विचारला. पण तरीहि श्रीधर कांहींच बोलेना. कधीं सरस्वतीकडे, तर कधीं वर झुलत असलेल्या विजेच्या बत्तीकडे शून्य दृष्टीनें पाहात तो बांकावर रेलून पडला होता.

सरस्वती गोंधळली. श्रीधरची ही अबोल्याची लहर तिला पूर्णपणें अपरिचित होती. खरें म्हणजे सरस्वतीलाच आज अगदीं कांहीं सुद्धां बोलूं नये असें वाटत होतें. अतिशय विचारांनीं तिचें मन अगदीं त्रस्त झालें होतें. पण आपल्या मनाची ही स्थिति लक्ष्यांत येऊन श्रीधरनें खिन्न होऊं नये, म्हणून बळेंच नानातऱ्हेच्या प्रश्नांची सरबत्ती तिनें आगगाडींत बसतांच सुरू केली होती. पण कांहीं केल्या श्रीधर बोलेना हें पाहून ती जराशी मनांत चरकली. आपल्या मनांत जे चमत्कारिक विचार घुडगूस

घालीत आहेत त्यांनींच तर आपल्या नवऱ्याचाहि आनंदी बोलकेपणा हुसकावून लावला नसेलना, अशा शंकेनें ती जराशी स्तिमित झाली. पण कांहींहि असलें तरी श्रीधराला बोलावयाला लाविलेंच पाहिजे अशा निश्चयानें तिनें आणखी एक प्रश्न सहजगत्त्या टाकला.

" आज इंटरचंसं तिकिट काढलं ? "

हा प्रश्न ऐकून श्रीधरची मुद्रा बदलली. तो ताडकन् उठून बसला व तीव्र स्वरानें म्हणाला,

" एवढं लक्ष्यांत येऊं नये तुझ्या ?–कां मला चिडवण्यासाठीं मुद्दाम विचारीत आहेस ? "

सरस्वतीचा चेहरा गोरामोरा झालेला पाहून किंचित् सौम्य स्वरानें श्रीधर बोलूं लागला.

" अग ! एवढी तुझी तारा अन् माधव स्वतः मोटारींतून स्टेशनवर पोंचवायला आलीं आपल्याला. त्यांना थर्डक्लासपाशीं उभीं करून खालीं माना घालायला कां लावायच्या आहेत आपल्यासाठीं ? गरीब असलों तरी दुसऱ्याला माझ्यासाठीं लाजलावणं न होऊं देण्याइतकी ऐपत आहे देवदयेनं मला ! "

सरस्वतीचा चेहरा खर्‌कन् उतरला.

गरीबी किंवा गरीबीशीं कोणत्याहि रीतीनें जडला गेलेला संबंध यांत शरमेची कांहीं गोष्ट आहे अशी कल्पनासुद्धां तिच्या मनाला आजपर्यंत शिवली नव्हती. श्रीमंत मैत्रिणीच्या वैभवशाली संसारांत चार दिवस ऐष–आरामांत काढतांना ती स्वतःच्या गरीबीचा विचार करीत नसे असें नाहीं. पण श्रीमंती–गरीबीचा संबंध ती फक्त ज्यास्त-कमी सुखसोईशीं जोडीत असे. आणि त्या सुखसोईचा विचारसुद्धां स्वतःपेक्षां नवऱ्याच्या बाबतींतच ती ज्यास्त करीत होती.

श्रीधर व माधव सहाध्यायी; पण माधवरावावर लक्ष्मी प्रसन्न असल्यामुळें तो जलपर्यटन करून सत्ताधारी बनला व सोन्यासारखीं ऐश्वर्यें त्याच्या·

पुढें अष्टौप्रहर हात जोडून उभीं राहूं लागलीं. पण श्रीधर...अलिकडे सर्व-साधारण हिंदुस्थानांतील पदवीधराच्या वांटयास जें येतें तेंच श्रीधरच्या आलें. खर्डेघाशी नाहींतर मास्तरकी. श्रीधर एका मुलांच्या हायस्कूलमध्यें मास्तर झाला व सुशील व्यवहारदक्ष पत्नीच्या साहाय्यानें संसारशकट संभाळून हांकूं लागला.

श्रीधर आणि सरस्वती कांहीं दरिद्री नव्हतीं; दुःखी नव्हतीं; पण अर्थातच आय्. सी. एस्. च्या आरामांतहि नव्हतीं. दैवानें केलेल्या या पक्षपाताचा विचार मनांत येऊन तारेच्या घरीं असतांना सरस्वतीला एखादे वेळेस जरा हुरहुरल्यासारखें होई. पण नवऱ्यानें तोच विचार असा निराळ्या तऱ्हेनें अगदीं मनाला लावून घेतलेला पाहून ती कष्टी झाली.

" हें काय हें ·असं बोलायचं ! " मृदु स्वरांत सरस्वती म्हणाली. " देवदयेनं काय कमी आहे आपल्याला ! माणसानें नेहमीं पायानें चालणारा-कडे बघावं असं आपणच नेहमीं मला सांगायचं असतं ना ? '

नवऱ्याला उपदेश करावयाचा मोठा घास लहान तोंडीं घेऊं नये म्हणून श्रीधरलाच मोठेपणा देत सरस्वती खुषीनें म्हणाली.

मैत्रिणीच्या घरचा सुखसोहळा पाहून व भोगूनहि सरस्वतीचे डोळे फिरले नाहींत, तिचा पूर्वीचा समाधानी स्वभाव कायमच आहे हें पाहून श्रीधरच्या तोंडावरचीं उदासीनतेचीं अभ्रें मावळलीं. प्रसन्न मुद्रेनें व सद्गदित स्वरानें तो म्हणाला,

" सरस्वती ! तूं म्हणजे एक रत्न आहेस नुसतं. " दुसऱ्या पॅसेंजरांच्या आपल्याकडे पाठी वळलेल्या आहेत अशी खात्री करून घेऊन श्रीधरनें सरस्व-तीचा हात प्रेमभरानें घट्ट दाबून धरला. " हें असलं दिव्य रत्न धुळींत लोळत पडलंय म्हणूनच वाईट वाटतं मला, सरु ! त्या तारेंत काय ज्यास्त आहे तुझ्यापेक्षां ! पण ती मात्र वैभवांत लोळावी, अन् माझी सरु मात्र... "

" हं, हं. भलतंच एखादं " नवऱ्याच्या तोंडावर हात ठेवल्यासारखा

करून सरस्वती म्हणाली. “ हरभऱ्याच्या झाडावर नाहीं हो अशी भोळ्या-सारखी चढायची मी ! आमची तारा म्हणजे खरोखरीच लाखांत मुलगी आहे. स्वरूप, शहाणपणा, सुग्रणपणा—कांहीं म्हणतां कांऽहींऽ कमी नाहीं तिच्यांत. तिच्या गुणांच्या मानानं म्हणजे एखाद्या संस्थानिकाच्याच घरीं पडायला पाहिजे होती ती ! ”

कांहींतरी आठवण होऊन श्रीधर हंसला.

“ हो, हो. ! तारेलाहि मनांतून असंच वाटत असावं. त्या दिवशीं कायशी धुसफुस चालली होती तुझ्यापाशीं, होय ना ? ”

पण सरस्वती कसली वस्ताद ! ती आपल्या मैत्रिणीचें व्यंग थोडेंच उघडकीस आणणार ! तिनें आपली ती गोष्ट ‘ कांहीं नाहीं ’ बोलून उडवूनच टाकली.

पण श्रीधरच्या प्रश्नानें कांहीं काळ थांबलेल्या तिच्या विचारांना मात्र दुप्पट जोरानें चालना मिळाली. तिला पुरेपूर आठवत होतें श्रीधर कोठल्या दिवसाविषयीं बोलत होता तें.

तें असें झालें होतें कीं माधवरावांना जावयाचें होतें क्लबांत पार्टीला. अर्थात् त्यांना मोटार हवी होती. ताराबाईंना पार्टीला बोलावणें नसल्यामुळें पाहुण्यांसह गांवाबाहेर फेरफटका करून येण्याची लहर आली होती. पण मोटार पडली एकच, आणि कलेक्टरीणबाईंनीं पायीं किंवा भाड्याच्या गाडींतून फिरायला जायचें म्हणजे कोण नामुष्कीची गोष्ट.

आपल्या नवऱ्याला दोन मोटारी ठेवण्याची ऐपत नाहीं म्हणून ताराला त्या दिवशीं मनोमन खेद झाला. इतका कीं सरस्वतीपाशीं तशा अर्थाचे कांहीं उद्गार काढल्यावांचून तिला राहवेना. तिच्या माहितींतली तिच्याहून रूपगुणांनीं जरा खालच्याच नंबरची एक मुलगी चार मोटारीवाल्या एका घरीं पडलेली होती.

त्या दिवशीं तारेची अगदीं अश्रू ढाळण्यापर्यंत मजल आली. सरस्वतीला मनांतून मोठें नवल झालें. माणसाची जेवढी अंगची योग्यता जास्त तेवढी

त्याची अपेक्षेची धांवहि जास्त; आणि अपेक्षा पुरी झाली नाहीं म्हणजे दुःख, मनस्ताप ठरलेला.

ही सगळी हकीकत आठवून सरस्वती मनाशीं म्हणाली– “ खरंच मी भाग्याची म्हणून गरीब आईबापांच्या पोटीं जन्मास आलें; माझें मध्यमच रूपगुण आहेत,–देवाची केवढी ही माझ्यावर दया ! त्यामुळेंच इकडच्या मध्यम प्रतीच्या संसारांत मला आभाळ ठेंगणें भासत आहे. ”

पण तारेबद्दलची ही सगळी हकीकत किंवा त्यावरून आपल्याला आतां सुचलेले हे विचार तिनें पतीपाशीं बोलून दाखवले नाहींत.

पण श्रीधरनें तिच्यावरून काढलेले उद्गार आठवून मात्र तिला मनापासून हंसावयाला येऊं लागलें. ती मनाशीं म्हणाली,–

“ काय वेडीं कोकरं आहोंत आम्ही ! तारासारखं वैभव मला नाहीं म्हणून हे खिन्न होतात; अन् माधवरावांचा थाटमाट यांना नाहीं म्हणून मला वाईट वाटतें ! स्वतःपुरता विचार केला म्हणजे मात्र मला वाटतं मी फार सुखी अन् यांना वाटतं कीं ते फार नशीबवान् ”—

सरस्वती एकदम चमकल्यासारखी झाली. “ आपण स्वतः फार सुखी आहोंत हें खरें. आपल्या योग्यतेपेक्षां कितीतरी थोर अशा माणसाच्या पदरीं आपण पडलों !

पण श्रीधरलाहि आपल्या स्थितीबद्दल असेंच समाधान वाटत असेल का ? आतां तो ‘ रत्ना ’ बद्दल कायसेंसें म्हणत होता ! पण छे, तें कांहीं खरे नव्हे ! आपण कसलें आलों आहों रत्न ! तारा,–तारा मात्र खरें रत्न आहे. किती भाग्यशाली आहेत माधवराव ! ”

पुन्हां सरस्वतीच्या विचारसूत्राला एक धक्का बसला व ताराच्या घरीं घालवलेले दिवस पुन्हां तिच्या डोळ्यांसमोर दिसूं लागले.

“ आपण माधवराव फार भाग्यशाली आहेत असें म्हटलें खरें, पण खुद्द माधवरावांना वाटत होतें का तसें ? ”

माधवरावांची ताराशीं होत असलेली वागणूक बारीक दृष्टीनें सरस्वतीनें

पुन्हां–पुन्हां मनाशीं निरखून पाहिली. पण छे, श्रीधरच्या तिच्याकडे लागलेल्या त्या नजरेंत त्याक्षणीं तिला जो संतोष जी धन्यता दिसत होती ती कांहीं माधवरावांच्या चेहऱ्यावर एकदां सुद्धां तिला आढळली नव्हती. उलट तारा जें–जें कांहीं करते त्यापेक्षां तिनें कांहीं तरी ज्यास्त करावें अशी त्यांची नेहमीं अपेक्षा असावी असें त्यांच्या बोलण्या–सवरण्यावरून वाटे.

शेजारच्या सबजज्जाच्या बायकोसारखी ड्रॉइंगरूम तारेला सजवतां येत नाहीं म्हणून माधवरावांला वाईट वाटे. तारेला गातां, सतार वाजवतां येतें; पण दुसऱ्या एका कलेक्टराच्या बायकोसारखें व्हायोलिन वाजवतां येत नाहीं म्हणून त्याला खेद होई. एका वकील मित्राच्या बायकोसारखीं फर्डीं व्याख्यानें तारेनें कधीं दिलीं नाहींत म्हणूनहि तो हळहळे, सरस्वतीच्या दृष्टीनें सर्वगुण-संपन्न असणाऱ्या तारेतला कांहींतरी दोष निवडून काढून प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष माधवराव नेहमीं जळफळल्यासारखें करीत !

या गोष्टी आठवून सरस्वतीला आश्चर्य वाटलें. काय असमाधानी, हावरा स्वभाव हा !

" पण छे ! "–सरस्वती मनांत म्हणाली–" हावरेपणा नव्हे हा ! माधव-रावांची न्याय्यच आकांक्षा आहे ही ! त्यांची आर्थिक योग्यता कळसाला पोंचली आहे; तेव्हां स्वतःची पत्नीहि स्वतःच्या योग्यतेप्रमाणें सगळ्या गुणांची खाण असावी अशी अपेक्षा त्यांनीं केली तर त्यांत वावगें तें काय ? "

" बरं झालं बाई !— " श्रीधरकडे वांकड्या डोळ्यांनीं पाहत सरस्वती मनाशीं उद्गारली " बरं झालं, इकडे इंग्लंडला नाहीं जाणं झालं ! नाहींतर माझ्यासारख्या सोंगाला पदरांत सुद्धां नसतं घ्यायचं झालं ! मग हें प्रेम नि कौतुक राहिलं बाजूलाच ! "

सरस्वतीच्या गालाला, बारीक हंसूं येऊन, गोड खळ्या पडल्या.

" काय, कसला विचार चाललाय् एवढा ? " श्रीधर खालीं वांकून तिच्या-कडे प्रेमळ नजरेनें पाहत म्हणाला, " आम्हांला नाहीं वाटतं त्यांतला कांहीं सांगायचा ? "

" कांहीं नाहीं. " वाऱ्यानें उडणारे केस मागें सारण्याचा प्रयत्न करीत सरस्वती म्हणाली, " मनांत आलं, चार दिवस तारेकडे जाऊन आलों, फार चांगलं झालं. आपण खरोखर किती सुखी आहोंत हें चांगलं समजलं, नाहीं कां ? "

श्रीधरला सरस्वतीच्या बोलण्यांतील कार्यकारणभाव कांहीं उमगला नाहीं. पण तो मनापासून म्हणाला, " खरंच, सरु ! गरीब नि साधीं-सुधीं असलों तरी आपण फार फार सुखी आहोंत. "

" गरीब नि साधीं-सुधीं असलों तरी, का गरीब नि साधीं-सुधीं आहोंत म्हणूनच ? " सरस्वती खुबीदार हंसत म्हणाली; पण इतक्यांत थाड्–थाड् घडघडत गाडी स्टेशनांत शिरली व त्यांचा डबा स्टेशनावरच्या हलकल्लोळानें दुमदुमून गेला.

# शांती



शांती कांहीं माझी मोठी जीवश्चकंठश्च मैत्रीण नव्हे; पण तिची आठवण मात्र माझ्या मनांतून कधींही पुसून जाणें शक्य नाहीं. तिचें आयुष्यच असें कांहीं चमत्कृतिपूर्ण व विलक्षण आहे कीं त्याचा ठसा कोणाच्याही मनावर कायमचा उमटून जावा. मीं तिला तीनच वेळां पाहिली; पण त्या तीनही वेळा म्हणजे तिच्या जीविताच्या तीन पायऱ्याच होत्या! त्या अवघ्या तीन पायऱ्यांत जीवितांतल्या साऱ्या आशा आकांक्षा, सारें लोभनीयत्व ओलांडून शांती आतां एक उदास विरागिनी होऊन राहिली होती.

  

माझी आणि शांतीची पहिली दृष्टादृष्ट माझ्या वहिनीच्या माहेरीं झाली. मी सासरहून माहेरीं आलें होतें आणि वहिनी माहेरीं कांहीं अडचण असल्यामुळें त्याचवेळीं माहेरीं राहावयास गेली होती. माझी व वहिनीची

भारी गट्टी, पूर्वीच्या आम्ही मैत्रिणी – आतां जरी नणंदाभावजया झालों तरी पूर्वीच्या खुल्या दिलानें वागत असूं. त्यामुळें आज मला वहिनीवांचून करमेना. भर उन्हाची वेळ आईच्या मुर्वतीखातर कशीबशी काढून चार वाजतां मी वहिनीच्या माहेराकडे मोर्चा वळवला. वहिनी अशीच चहापाणी आटपून डाळतांदूळ निवडीत बसली होती.

मी उंबऱ्यांत पाऊल टाकल्याबरोबर नेहमींच्या थट्टामस्करीस आरंभ केला. "वहिनीबाई, उठा आधीं. दादाचें पकडसमन्स घेऊन आलें आहे मी."

वहिनीनें मला उद्धून पाट दिला व हात धरून मला खालीं बसवलें. आमची वहिनी आधींच नेहेमींची हसतमुख, त्यांतून मी तिची जिवलग मैत्रीण व आवडती वन्सं. तेव्हां मला पाहून तिचा चेहरा उल्हासानें डंवरायचा व तिच्या थट्टामस्करीला ऊत यायचा. पण आज कां कोण जाणे, तिच्या आनंदी चेहऱ्यावर उदासीनता किंचित् डोकावीत होती. पण स्वप्नांत सुद्धां थट्टेचें बोलणेंच वडबडायची संवय तिला; तेव्हां माझी थट्टा केल्याशिवाय थोडीच राहाते ती!

"अगबाई, उंबराचें फूल इकडे कुठें पुण्याला दृष्टीस पडलं! जांवईबापूंनीं सोडलंनीं कसं आपल्याला, बाईसाहेब? कां आलेत तुमच्या पाठोपाठ इकडे?—इथें दारासमोर उभे तर नाहींत ना?"

मला असली थट्टा मनांतून पाहिजेच होती. पण बाहेरून रागावल्यासारखं करून मीं म्हटलें "ए वहिनी, पुष्कळ झालं पाघळलीस तेवढी. जरा दुसऱ्यांच्या समोर तरी तोंड आवरीत जा."

वहिनीसमोरच, तिला तांदूळ निवडायला मदत करीत, एक आमच्या एवढीच मुलगी बसली होती. तिचा नीटस चेहरा व सडपातळ बांधा पाहून तिच्याविषयीं, कां कोण जाणे, माझ्या मनाचा एकदम अनुकूल ग्रह झाला. माझें बोलणें ऐकून तिनें झटकन मान वर करून माझ्याकडे बघितलें. मी एकदम दचकल्यासारखी झालें. कारण तिच्या चेहेऱ्यावर तिच्या वयाला साजेसा आनंद व उल्हास अजिबात नव्हता. एकाद्या सुंदर चित्रावर फास-

लेल्या काजळाप्रमाणें तिच्या चेहेऱ्यावर विषण्ण औदासिन्याची काळीकुट्ट छटा घनदाट पसरली होती.

"इश्श," ती माझ्याकडे व वहिनीकडे अर्धवट पहात उद्गारली. "मी कांहीं परकी नाहीं तुमच्या वहिनींना !"

वहिनी तिचा आवाज ऐकून एकदम चरकल्यासारखी झाली ?

माझी प्रश्नचिन्हदर्शक मुद्रा ओळखून ती म्हणाली "तुमच्या ओळखीची नसेल ही वन्सं. या इथेंच आमच्या वाड्यांत असतात हिचीं माहेरचीं बिन्हाडाला ! सासर आहे मुंबईला. तिचं माझं लग्न एकाच दिवशीं झालं गतवर्षी ! नाहीं ग शांते ?"

शांतीच्या चेहऱ्यावर या प्रश्नानें झालेले फेरफार पाहून वहिनी चपापली !

"हो" शांती खिन्नपणें हंसून म्हणाली. "पण माझं झालं मुंबईला नि तुझं झालं इथें पुण्याला. या दोन जागांत जितकं अंतर तितकंच तुझ्या माझ्या हल्लींच्या स्थितींत अंतर आहे, नाहीं ताई ? या तुझ्या वन्संचंही लग्न गेल्या वर्षीच झालं नाहीं का ?"

शांतीनें एक दीर्घ उसासा टाकला. मला अगदीं कसेंसेंच झालें. तिच्या वयाला वावडा असा तिचा तो उदासवाणा चेहरा व खिन्न हसणें बोलणें पाहून मला व वहिनीलाही अगदीं चोरट्यासारखें वाटूं लागलें. आम्ही हसलों व एकमेकींच्या थट्टा केल्या हा शांतीचा मोठा अपराध केला असें मला भासूं लागलें. पुढें काय बोलावें हें आम्हाला कोणालाच सुचेना. कर्मधर्मसंयोगानें शांतीच्या आईनें तिला तितक्यांत हांक मारली व ती उठून गेली. उठून जातांना तिला एकदांचें सुटल्यासारखें वाटलेलें दिसलें अन् आम्हां दोघींनाही हायसें वाटलें !

मी वहिनीपेक्षां एक वर्षानें लहान होतें. त्यामुळें सुखाच्या वेळीं समवयस्क मैत्रिणीसारखी पण दुःखाभितीच्या वेळीं ती मला मोठ्या वहिणीसारखी वाटे.

भयभीतपणें तिच्याकडे बघून, तिचा हात धरून, मी तिच्या अगदीं जवळ सरकून म्हटलें "हें काय ग असं ती म्हणाली वहिनी ?"

"हं. गरीब बिचारी, काय करील !" वहिनी उसासा टाकीत म्हणाली. "गेल्या वर्षीच लग्न झालं. पण सुखच नाहीं कपाळीं दिसत तिच्या. नवरा कसासाच वागतो. त्याला म्हणे काय शिकलेली बायको हवी होती वाटतं. पण बापाच्या भिडेला पडून लग्नाला उभा राहिला. अन् आतां करतो आहे थेरं थेरं—"

"वागवीत नाहीं तिला ?" मीं जास्तच भयकंपित स्वरानें प्रश्न केला. नवोढेला या असल्या हकीकती ऐकल्या म्हणजे कशी धडकी भरते हें अनुभवावांचून कळायचं नाहीं ! आतां मला तसली भीति नव्हती म्हणा. पण सगळेंच नवीन नवीन, तेव्हां काळीज थरारल्यावांचून थोडेंच राहातें ?

"वागवतो हो —पण कसलं वागवणं तें. दोन वेळां तुकडा खायला नि रातची पथारी पसरायला येतो घरीं. बाकी सारा वेळ त्याचं काम, वाचन, सभा, मित्र, खेळ, एक आणि दोन—मोठा हौशी आहे प्राणी—पण बायकोचें नांव नको. ही सुद्धां किती हौशी होती हो लग्नाच्या आधीं ! पण नवऱ्याचा सूर संसारांत लागत नाहींसा पाहून हिनें ही अशी हाय घेतली. कधीं परमेश्वराच्या मनांत येईल आणि यांचीं मनं मिळून येतील तेव्हां खरीं."

बोलतां बोलतां वहिनीनें पाटावरचे निवडलेले तांदूळ सुपांत लोटले व सूप पाटाखालीं सारीत ती म्हणाली, "चला वन्सं घरांत. चहा टाकतें थोडा."

मी घरांत गेलें. तासभर चांगली मी वहिनीशीं गप्पा मारीत बसलें होतें. पण त्या दिवशीं आमची थट्टामस्करी कांहीं रंगांत आली नाहीं. शांतीची अकालीं उदास झालेली मुद्रा वरचेवर माझ्या डोळ्यांपुढें उभी राहात होती.

  

या गोष्टीला एक वर्ष किंवा जास्तच लोटलें. मी पुन्हां माहेरीं आलें होतें. माझ्या वहिनीचा 'आनंद' आतां माझें जीवनसर्वस्व होऊन राहिला होता. पूर्वीं माझी बैठक जेथें वहिनी असेल तेथें असावयाची; पण आतांशा माझा

आनंद जिथें असेल तेथें मी असावयाची. तो न्हातांना न्हाणीघरांत, निजतांना पाळण्याच्या खोलींत, फिरतां खेळतांना अंगणांत अशी मी दिवसभर त्याच्या मागेंमागें असें.

त्या दिवशीं संध्याकाळीं मी अशीच बागेंत आनंदाला खेळवीत बसलें होतें. नुकतींच उमललेलीं गुलबाक्षीचीं रंगारंगाचीं फुलें तोडून तीं कुठें त्याच्या कानावरच ठेव, कुठें तीं एकांतएक गुंफून त्याच्या जावळालाच पिंपळपानासारखीं बांध, अशी मी नानाप्रकारें त्याला सजवीत रिझवीत होतें. तो गुलाम सारखा ' हा, हा ' करून खिदळत होता. मीं घातलेलीं फुलें काढून टाकून मिस्किलपणें माझ्याकडे बघून हांसत होता व माझ्या ओच्यांत हात घालून सगळीं फुलें फिस्कारून टाकीत होता.

इतक्यांत वहिनी आली. आपल्या वात्सल्यपूर्ण नजरेनें आम्हां दोघांना निरखीत थोडा वेळ ती तशीच उभी राहिली.

" कां, जाऊं याला ठेऊनच वन्सं ? " पुढें होऊन शेवटीं ती म्हणाली, " बरा खेळतो आहे गुलाम ! "

आईचा शब्द कानीं पडतांच पुढचीं सारीं फुलें उधळून देऊन आनंदानें तिच्याकडे झेंप टाकली. वहिनीनें चटकन त्याचे बदलायला आणलेले कपडे माझ्या आंगावर टाकले व त्याला जवळ घेऊन त्याचे केस ती प्रेमानें नीटनेटके करूं लागली.

आमच्या खेळाचा हा असा विरस झालेला पाहून मीं लटक्या रुसव्यानें म्हटलें, " आम्ही नाहीं संभाळणार तुझ्या रत्नाला ! तूं जा आपली त्याला घेऊन. "

" इश्श, आत्याबाई रुसली वाटतं ! " वहिनी माझ्या शेजारीं बसली व त्याचें तोंड पुसून कपडे बदलूं लागली. मी त्यानें रडूं नये म्हणून काउमाउ करीत, नानाप्रकारचे चाळे त्याच्यापुढें करीत होतें. तो गुलामही फार रडला नाहीं. कारण रोज संध्याकाळीं या ' भयंकर दिव्यां'तून पार पडल्याशिवाय आत्याबाई भुर्र नेत नाहीं हें त्या लबाडाला पक्कें ठाऊक झालें होतें.

कपडे झाल्याबरोबर आनंदानें माझ्याकड झेप टाकली. त्याला कवटाळून त्याचे पापे घेत मीं म्हटलें, "आतां कशी आलीस पण—अग लुच्चे—आम्ही नाहीं नेत तुला आतां भुर"—

आनंद मला जास्तच बिलगला आणि वहिनीनें बोलावलें तर मुरकून माझ्या खांद्यावर तोंड लपवूं लागला.

"मग असं करा वन्सं" वहिनी शेवटीं म्हणाली. "तुम्ही पण चला माझ्याबरोबर. तुमच्या तर ओळखीची आहेच ना ती शांती?" शांतीचें नांव ऐकतांच ब्रेक दाबून धक्का बसल्याबरोबर आगगाडी जशी एकदम थांबते तसें माझें मन धक्का बसून स्तब्ध झालें. आनंदाला त्याच्या इच्छेप्रमाणें अलगद जमिनीवर सोडून मी माझ्या स्मरणाचे कप्पे उघडूं लागलें. लक्कन् वीज चमकल्याप्रमाणें माझ्या हृदयांत एकदम प्रकाश पडला.

"हां, हां. ती शांती होय वहिनी? तिलाच का तूं बाळंतविडा घेऊन चालली आहेस आज!" मी आश्चर्यानें म्हणालें.

"हो ना!" वहिनी म्हणाली. "ती जाणार आहे उद्यांच बहुतेक मुंबईला. यजमान न्यायला आलेत म्हणे. म्हणून तर आज जायलाच हवं मला. आजउद्यां अशी चालढकल करतां करतां तिला तीन महिने होऊन ती निघाली सुद्धां."

ही बातमी ऐकून माझ्या मनांत विचारांचा हलकल्लोळ उडाला. वहिनीकडून याचा कांहीं उलगडा पडला तर पहावा म्हणून मी वर पहातें तों वहिनी आनंदाला उचलून घरांत गेली सुद्धां."

"वन्सं लुगडं पालटायचं असलं तर पालटा हं." जातां जातां ती म्हणाली.

अर्ध्या तासाच्या आंत सगळी तयारी करून आम्ही शांतीच्या घरीं घेऊन पोंचलों. शांतीच्या घरीं एकच गडबड उडाली होती. शांतीची आई स्वयंपाक-घरांत आयाबायांच्या मदतीनें लेकीबरोबर देण्यासाठीं डिंकाचे लाडू व बदामा-सुंठीच्या वड्या करण्यांत निमग्न झाली होती. कुणी जांवयाबरोबर देण्याचें

फराळाचें करण्यांत गुंतल्या होत्या; कुणी भरतीची वेळ पाहून काजळ धरायला ठेवायच्या गडबडींत होत्या; कुणी तीट खलीत होतें तर कुणी शांतीची चोळी बेतण्यांत गढलें होतें. ओटीवर सोनार नाकावर चष्मा चढवून एका मोत्याच्या डुलाशीं कायशी खाटखुट करीत होता. बाळंतिणीच्या खोलींत शांतीची व तिच्या धाकट्या बहिणींची गडबड चाललेली ऐकूं येत होती. शांतीला विचारून ट्रंक भरण्यांत तिच्या बहिणी गुंतल्या होत्या. 'बाळाच्या नव्या झबल्यागलोत्यांचें निराळें गाठोडें बांध' 'माझें मी बारशाच्या दिवशीं नेसलें होतें ना तें नवें लुगडें आईच्या पेटींत असेल बघ.' 'बाळाचा चांदीचा खुळखुळा रिंगणं कुठाय ग!' 'आई, अ, गुटीचा डबा कुठाय् ग? आणि तें लोकरीचं परवां मीं विणलेलं कुणीसं नेलं होतं तें आणून दिलं का ग?' असे शांतीचे शब्द मधून मधून ऐकूं येत होते.

एक वर्षापूर्वी बाल्ययौवनाच्या ऐन सीमेवर थिजून गेलेल्या निरुत्साही शांतीची आजची ती गडबड ऐकून मला जरा आश्चर्यच वाटलें. हातपाय धुऊन शांतीच्या खोलींत पाय ठेवतांच, शांतीला पाहून तें द्विगुणित झालें. शांतीचा बाळंतिणीचा वेष कांहीं मोठा मनांत भरण्याजोगा होता, असें नाहीं. जुनें विटकें लुगडें, डोक्यावरून घेतलेला बावळटसा पदर, लांब बाह्यांचें मळकें पोलकें, पायांत रंग गेलेले तेलकट मोजे व त्यावर घातलेला जुना मेणचट जोडा–या वेषांत अप्सरा सुद्धां हबशिणीसारखी दिसायची. पण शांतीच्या तोंडावर अशी कांहीं टवटवी, डोळ्यांत अशी कांहीं आनंदाची मजेदार चमक व अंगोपांगीं उत्साहाची अशी कांहीं लवलव सळसळत होती कीं पूर्वीची शांती ती हीच का असा मला क्षणभर भ्रम झाला व वस्तुस्थितीची ओळख पटतांच परमावधीचें आश्चर्य व समाधान वाटलें!

तिच्या ताईला पाहून शांतीला फार फार आनंद झाला.

"ये ना बस अशी–वन्सं या की–ओळख नाहींना विसरलांत? ताई किती दिवसांनीं आलीस ग ही! चल मेलं–माणसानं आशेनं तुझ्या वाटेकडे डोळे लावावे नि तूं मात्र आपल्या सोनुल्याच्या गडबडींत मग्न अं?"

आनंदाला मांडीवर घेऊन शांती त्याचे गुलाबी गाल कुरवाळूं लागली. पण तो कसला छट. केव्हांच तिच्या हातांतून निसटून मला येऊन बिलगला. शांतीचेंही त्याच्याकडे फारसें लक्ष नव्हतें. ती आपल्याच बोलण्यांत गर्क होती.

"मला किती तुझ्यापाशीं लोकरीचें टोपरें विणायला शिकायचं होतं ग! थंडीचे दिवस आले ना तोंडीं आतां. आणि बाळाला कपडे पण बेतून घ्यायचे होते. गुलामाला पहिले कपडे पार होत नाहींसे झाले बघ."

बाजेवरच्या आपल्या तान्हुल्याकडे सप्रेम पहात डोक्यावरचा पदर वरचे-वर सरसावीत शांतीची टकळी सारखी चालली होती. इतक्यांत बाजेवर 'कुउंउं' झालें. विजेचा झटका बसल्याप्रमाणें शांती ताडकन उठली.

"उठला वाटतं. आतां घेऊन निजवला होता ताई. लुच्च्याला झोंप कशी ती नाहीं बघ. कसं व्हायचं ग माझं मुंबईला? मला मोठी काळजी येऊन पडलीय बघ?"

"कां, वडील घेतील कीं!" मी हळूच कुजबुजलें. शांतीनें एकवार माझ्याकडे तीक्ष्ण नजरेनें बघून, ऐकल्या न ऐकल्यासारखें केलें व चटकन् आपल्या बाळाला आणून मोठ्या हळुवारपणें आपल्या ताईच्या मांडीवर दिलें.

आमची वहिनी तर काय जणूं मूर्तिमंत वत्सलताच! तेव्हां लवकरच त्या दोघीही त्या नव्या सोनुल्याच्या कौतुकांत पार गढून गेल्या. त्याचीं गोरींगोरीं बाळसेदार उसाच्या करव्यासारखीं रसरशीत मनगटें व पोटऱ्या चाचपण्यांत, त्याचें जावळ कुरवाळीत, ते नीटसपणें मागें सारण्यांत, व त्याच्या मऊ गालावरून वरचेवर हात फिरविण्यांत व तोंडानें औषधपाणी, न्हाणेंमाखणें, कपडे बाळलेणें यांची नानाविध चर्चा करण्यांत त्या अगदीं गुंग होऊन गेल्या. मला उगीचच चोरट्यासारखें वाटूं लागलें. मीही लांकडाच्या ठोकळ्यांनीं आनंदाला बंगला बांधून देण्यांत अगदीं गर्क झाल्याचें दाखवूं लागलें.

"यांना नाहीं वाटतंऽ अजून कांहीं!" त्यांच्या बोलण्यांतून मी वेगळी

पडलेली ओळखून, शांती माझ्याकडे वळून म्हणाली, " होऊं दे एकदां लवकर. बायकांच्या जिवाला एवढाच काय तो विरंगुळा. नाहीं ग ताई ? "

बहिनी संथपणें तिच्याकडे पहात किंचित् हंसली.

" बाळाचे वडील आले आहेत ना ? " मी एकदम म्हणालें. मी हा असा प्रश्न एकाएकीं कां केला हें माझें मला सुद्धां नीट सांगतां आलें नसतें. माझें उणें काढून शांतीनें मला ओशाळी केली याचा सूड घेण्यासाठीं तिचें उणें काढून तिला खिजविण्याचा माझा हेतु होता का ? का शांतीच्या नवऱ्याविषयींच्या भावनेंत कांहीं फरक पडला आहे कीं काय हें अजमावण्याचा माझा उद्देश होता ?

ह्या दुसऱ्या उद्देशानें जर मीं प्रश्न केला असला तर तो मात्र पूर्णपणें सफळ झाला. शांतीच्या चेहऱ्यावरचें वात्सल्य व उत्साह हीं एकदम मावळलीं. तिरस्काराची एक आठी तिच्या कपाळावर चढली. " हं " तिनें तुच्छतापूर्वक मान हिसडीत म्हटलें. असला अप्रिय विषय, एकदां आपण दुर्लक्ष केलें असूनही, पुन्हां पुन्हां मी काढीत असलेली पाहून माझ्याकडे जळजळीत डोळ्यांनीं तिनें बघितलें असा मला भास झाला. पण लगेच ती आपल्या छबुकड्याकडे वळली व पुन्हां पूर्वीच्या गप्पा बळेंच काढून त्यांत गर्क झाली.

मी ओशाळल्यासारखी जागच्या जागीं थिजून त्यांच्याकडे बघत राहिलें. माझ्या नकळत माझ्यापुढें, आम्हां दोघांमध्यें एकदां झालेलें बोलणें उभें राहिलें.

मुलें होण्याबद्दल गोष्टी निघाल्या होत्या. म्हणायचें झालें, " बराय मुलं नाहींत तें. मूल झालं म्हणजे बायकांना नवरे कःपदार्थ वाटूं लागतात. *His Majesty* च्या राज्यांत बिचाऱ्या नवऱ्याला दारापासल्या पायपोसाइतकीसुद्धां किंमत नाहींशी होते. "

हेंच खरें तर मग ! मूल झाल्यानें या नवराबायकोचीं दुरावलेलीं हृदयें एकत्र येतील ही माझ्या मनांत अंधुकपणें डोकावत असलेली आशा फोलच

ठरणार ! ज्यावेळीं शांती आपल्या भावनाकुल हृदयाचा ठेवा कोणापाशीं तरी ठेवण्यासाठीं अधीर झालेली होती, त्यावेळीं तिचा नवरा उदासीनपणें इतर विषयांत गर्क झाला; मग आतां तिच्या वात्सल्याचा मिरासदार निर्माण झाल्यावर तिनें नवऱ्याच्या नांवाचाही तिटकारा करावा, हें सहजच नाहीं का ?

  

आमच्याकडे आतां मुंबईस सनद काढली होती व आम्ही मुंबईस आमचा छोटासा संसार थाटला होता. माझ्या नव्या संसाराचें कौतुक बघण्यासाठीं माझ्या आईच्या जागीं असलेली वहिनी माझ्या आग्रहावरून मुद्दाम मुंबईस आली होती. आपला संसार सोडून ती माझ्याकडे कितीशी राहाणार ? चार दिवस राहून ती आतां उद्यां जाणार होती. त्यामुळें आम्ही दोघीही आज जरा उदासच होतों. संध्याकाळीं मुंबईतलें उरलें सुरलें वहिनींना दाखवायला मी बाहेर पडलें. आज कोर्टांतून परस्परच कुठेंसें पार्टीला जायचें होतें; म्हणून आम्ही दोघीच आनंदाला घेऊन निघालों. वहिनी नकोनको म्हणत असतां नानातऱ्हेचीं खेळणीं वाटेंत मी आनंदाला घेऊन देत होतें. हिंडतांहिंडतां आम्ही गोऱ्या रामाच्या देवळापाशीं आलों व विश्रांतीसाठीं म्हणून आंत शिरलों. दर्शन घेऊन तेथल्या बाकावर जरा टेंकतों तोंच शांती समोरच दारांतून शिरतांना आम्हांला दिसली. हीच माझी व शांतीची तिसरी भेट.

शांतीला आम्हीं दोघींनीं ताबडतोब ओळखली व अशी अचानक तिची गांठ पडलेली पाहून आम्हाला फार आश्चर्य व आनंद वाटला. शांतीच्या कडेवर तिचा बाळ होता. बाळ अगदीं शांतीसारखाच गोरा व नीटस असून मोठा आनंदी व खेळकर दिसला. बाळ पाहून आनंद उल्हासला व त्याला आपलीं नवीं खेळणीं दाखवून त्याच्याशीं खेळूं लागला. शांती आपल्या ताईजवळ बसली. तिचा चेहरा अगदीं निस्तेज व पिकुटलेला दिसत होता. डोळे खोल गेलेले असून चैतन्यहीन दिसत होते. वहिनी इकडे कोठें, कशा-

करितां वगैरे विचारपूस तिनें केली. वहिनी उद्यां पुण्याला जाणार हें ऐकून तिच्या चेहऱ्यावर उत्कटतेचा भाव क्षणभर उमटला पण लगेच एका उसाशा-सरशीं तो मावळून जाऊन नेहमींची उदासीन छटा तिच्या तोंडावर आली.

" येणार का माझ्याबरोबर पुण्याला माहेरीं ? " वहिनीनें हसतहसत विचारिलें.

शांतीनें नुसतीच मान हलवली !

" कांग, नुकतीच जाऊन आलीस वाटतं ? "

शांतीनें आपले आतां फारच मोठे दिसत असलेले डोळे वहिनीकडे रोखून म्हटलें, " वर्ष झालं याला लहान घेऊन आलें, त्याच्यावर गेलेंच नाहीं. "

मी नेहमींप्रमाणें मुकाट्यानें त्यांचें बोलणें ऐकत होतें. शांतीनें हें वाक्य बाळाकडे पाहून उच्चारलें तेव्हांची तिची ती स्नेहशून्य दृष्टी व शुष्क स्वर पाहून मला आश्चर्य वाटलें. आमची वहिनी जेव्हां जेव्हां आनंदाकडे पाहून त्याच्याविषयीं कांहीं बोले, तेव्हां तिच्या त्या स्निग्ध, प्रेमळ नजरेत आनंद न्हाऊन निघत आहे असें वाटे. तिच्या आवाजाचे कोमल निनाद आनंदाचें गोजिरें तोंड कुरवाळीत आहेत, असा भास होई. पण शांती दहापोरांच्या खस्ता खाऊन कंटाळलेल्या एकाद्या पोक्त्या पुरवत्या बाईसारखी वैतागून बोलत होती. एक वर्षापूर्वीची शांतीची प्रेमळ वागणूक मला आठवली. माझी चौकस बुद्धी जागृत झाली व तिच्या वागणुकींत पडलेल्या या फरकाचें कारण शोधण्यासाठीं मी तिचा प्रत्येक शब्द व प्रत्येक हालचाल लक्षपूर्वक पाहूं लागलें.

" याच्यामुळें माहेर मला पारखं झालंय आतांशा " शांती वहिनीला सांगत होती. " त्यांच्याशिवाय हा घटकाभर राहात नाहीं. दूध प्यायला, निजण्याला, आंघोळीला त्यांच्याजवळ. एखाददिवस गांवाला गेले तर रडून रडून जीव काढतो. मग कशी जाणार मी माहेरीं ? "

बापाचा मुलाला लागलेला लाडिक लळा दुसरी एखादी आई कौतुकानें,

अभिमानानें वर्णन करून सांगती. पण शांती रोषपूर्ण स्वरानें, तक्रारीच्या आवाजानें हें बोलत होती.

" माझ्याकडे सुद्धां येत नाहीं त्यांच्याजवळून. "

शांतीच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले असें तिच्या कांपऱ्या आवाजावरून मला वाटलें—पण नाहीं—तिचें मनाचें शल्य अश्रूंची पायरी ओलांडून गेलें होतें. शल्य सलणें, डोळ्यांत अश्रू येणें ही नसांच्या व मनाच्या जिवंतपणाची खूण आहे. पण शांतीचें मन उपासमारीनें तडफडत केव्हांच मरून गेलें होतें.

वहिनी अगदीं गोंधळल्यासारखी झाली. तिला काय बोलावें तें सुचेना.

" वाळली आहेस बघ किती " शांतीचा हात आपल्या हातांत घेऊन तिच्या सैल बांगड्या मनगटांत वरखालीं करीत वहिनी म्हणाली. " कामाची ओढ फार पडते का ? "

" छे ग " शांती मान हालवीत म्हणाली. फार दिवसांनीं लाभलेल्या मायेच्या या ओलाव्यानें तिचें करपलेलें हृदय जरा हालचाल करूं लागलें होतें.

" हें बघ–" वहिनी हलक्या आवाजांत जरा आसपास चौकस नजरेनें पाहून म्हणाली, " स्पष्ट विचारतें, रागावूं नकोस–पुन्हां तुझी माझी गांठ केव्हां पडते आहे कोण जाणे—मन मोकळें करून सांग—तुझा नवरा मुलावर इतकी माया करतो तेव्हां आतां तुझ्याशींही नीट वागूं लागला असेल—होय ना ? "

कठोर मुद्रेनें, रुक्ष आवाजांत शांती म्हणाली " पूर्वींचीच वागणूक कायम आहे सारी. पण खरं सांगूं ताई, मला कांहींच वाटत नाहीं त्याबद्दल. "

" खरं तें शांते—आपली ती बाजू नव्हेच म्हणून सोडून द्यावं, हाच शहाणपणा. आतां तूं आपली या बाळाकडे बघून दिवस काढीत जा. बाळही कसा तुझा हिऱ्यासारखा आहे. तुझे सारे पांग फेडील बरं तो ! "

शांती बाळाकडे थिजलेल्या डोळ्यांनीं पाहात वहिनीचे हे वात्सल्यानें ओथंबलेले उद्गार ऐकत होती. बराच वेळ ती कांहीं बोलली नाहीं. पण

शेवटीं झटकन वहिनीकडे वळून तिचा हात घट्ट धरून तीव्र स्वरानें ती म्हणाली,

" ताई खरं सांगूं तुला ?–रागावणार नाहींस ना ?–मला याचा— तिटकारा येतो ! "

वहिनी सुंदर फुलांच्या परडींत साप दिसल्यासारखी दचकली व शांतीचा हात तिनें हिसडून टाकला. मलाही अगदीं कसेंसेंच झालें.

शांती कांहींशा उद्विग्न व करुण स्वरानें म्हणाली,

" ताई मला ठाऊकच होतं तूं रागावशील असं. पण किती दिवस आज ही गोष्ट पोटांत डांचत आहे—राहवेना शेवटीं आज मला "—

" शांते " वहिनी शांतीचा हात पुन्हां आपल्या हातांत धरून म्हणाली " हें काय विचित्र बोललीस ग तूं ? अग, तुझ्या नवऱ्याचं कठोर हृदय सुद्धां या बाळाच्या सहवासानें विरघळलं म्हणून सांगतेस आणि तुझं, आईचं मायाळू हृदय ग कसं असं दगडासारखं झालंय् ? "

आतां मात्र शांतीच्या हृदयांत तिचें तें अपरंपार दुःख राहीनासें होऊन डोळ्यावाटे अश्रू स्रवूं लागले. अगदीं केविलवाणी होऊन ती सांगूं लागली,

" ताई, या सगळ्याला तेच ग कारण आहेत. त्यांना दोष लावायचा तर लाव. गेल्या वर्षी तूं पुण्याला पाहिलं नाहींस का माझ्या बाळाला मी कशी जिवापाड जपें ती. माझ्या बाळानं मला जसा कांहीं नवीन जन्म दिला होता. मी बाळाची अन् बाळ माझं या कल्पनेनें मला अस्मान ठेंगणं वाटत होतं. पहिले पांचसहा महिने बाळाचं सारं जग माझ्यांत सामावून राहिलं होतं. आणि मी पूर्ण सुखी होतें. पण माझें हें सुख देवाला फार दिवस पाहवलं नाहीं. बाळ हसूं खेळूं लागला—रांगून घरभर खोड्या करूं लागला—तोंडानें लाडकी बोबडी बडबड करूं लागला—आणि यांचं लक्ष त्याच्याकडे ओढ घेऊं लागलं. त्यांना तो दिवसेंदिवस फार आवडूं लागला. त्यांची घरांत नेहमीं निर्विकार असणारी मुद्रा बाळाच्या सान्निध्यांत सदैव हसरी राहूं लागली पण ते त्याचें कौतुक करूं लागले, " माझा बाळ " म्हणून आळवूं

रिझवूं लागले कीं माझ्या जीवाचं पाणी पाणी होई. माझ्या एकुलत्या एक सुखाच्या ठेव्यांत ते वांटेकरी होऊं पहात होते! माझें हृदय तें पाहून तडफडे—तरी मीं धीर सोडला नव्हता—पण ताई शेवटीं—"

शांतीच्या स्वरांतील दीनपणा पार मावळून आतां त्यांत एकप्रकारचा विलक्षण कठोरपणा आला. तिच्या त्या तीक्ष्ण स्वरानें व दृष्टीनें माझ्या हृदयाचा थरकांप होत होता.

"ताई" शेवटीं—बाळ हळूहळू त्यांच्याकडे ओढ घेऊं लागला. त्यांची ओळख धरून त्यांच्याशीं हसूंखिदळूं लागला. त्यांच्या वाटेकडे तो डोळे लावून बसे. ते बाहेरून आले कीं माझ्या कडेवरून त्यांच्याकडे उडी घाली; त्यांना सोडून माझ्याकडे येण्याला तो अगदीं नाखूष असे. त्यांच्याशिवाय दूध पीत नाहींसा झाला, झोंपी जाईनासा झाला—आणि ताई, अशा या कृतघ्न पोरट्यावर मीं प्रेम करावं म्हणतेस? याचा कोंवळा जीव जतन करण्यासाठीं मी रात्री दिवसासारख्या जागून काढल्या; हाताचा पाळणा केला आणि मांडीचा पलंग बनवला—आणि शेवटीं त्यानें माझी माया लाथाडून मला तुच्छ लेखणाऱ्या आणि त्याच्यासाठीं कधीं काडीचीही झीज न काढलेल्या माणसाच्या गळ्यांत प्रेमाच्या मिठ्या घालाव्या आणि तरीही मी आईच्याच मायेनें त्याच्यावर प्रेम करून, त्याच्यावर जीव जगवावा म्हणतेस?—नाहीं! ताई, कांहींही म्हण तूं मला—दगड म्हण, पिशाच्च म्हण—मला या मुलाबद्दल कांहींही वाटत नाहीं!—उलट तिटकारा येतो—चीड येते—!"

  

शांतीची त्यावेळची ती कांहींशी अगतिक व कांहींशी वैतागलेली आणि चिडलेली मुद्रा व त्यावेळचे तिचे ते सहृदय माणसाच्या कानाला कढत शिशाच्या रसाप्रमाणें जाळणारे उद्गार माझ्या स्मरणांतून कधींही जाणें शक्य नाहीं.

## सगुणा ६

गणपतची सगुणेवर आपल्या पोटच्या पोरीपेक्षांहि जास्त माया होती. तिच्या सुरेख रूपाचें, तिच्या चुणचुणीत बोलण्याचालण्याचें, तिच्या घरकामांतल्या टापटिपीचें कौतुक करतां करतां गणपतला सारा दिवस पुरा पडत नसे. सगुणा गणपतची भावजय आहे, हें परक्या माणसाच्या कांहीं चटकन् ध्यानांत आलें नसतें.

पण ज्यांनीं गणपतला अगदीं पहिल्यापासून पाहिलेला होता, त्यांना मात्र गणपतच्या वागणुकीचें कांहींच आश्चर्य वाटलें नसतें. गणपतनें, आपल्या धाकट्या भावाला, महादूला आईबापांच्या पाठीमागें मोठ्या जिव्हाळ्यानें वाढवलें होतें. त्याच्या चार यत्ता करून, आपल्याच पोस्टांत रनरची नोकरी त्यानें महादूला लावून दिली होती. गणपतचें लग्न होऊन सात आठ वर्षें झालीं होतीं, तरी पोटीं पोर नव्हतें. त्यामुळें दोघां नवराबायकोंचा महादूवरच

सारा जीव होता. हौसेनें त्यांनीं महादूचें लहानपणींच लग्न केलें व नक्षत्रासारखी सगुणा घरांत आणली.

सगुणा गरीब व पोरकी होती. पण तिच्या रूपगुणाकडे लक्ष देऊन गणपतनें तिला आपल्या लाडक्या भावाला करून घेतलें होतें. महादूसारखाच सगुणेवरहि दोघांचा फार जीव होता. कर्मधर्मसंयोगानें सगुणा घरांत आल्यानंतर, गणपतच्या बायकोची कुस उजवली. " मोठ्या पायगुणाची आमची सगुणा " म्हणून नवराबायकोंना सगुणेला कुठें ठेऊं न ठेऊंसें झालें होतें.

दोघे भाऊ एका ठिकाणींच मोठ्या गोडीगुलाबीनें राहात. दोघांचीहि मिळकत बेताचीच. एकाचें पीठ, दुसऱ्याचें मीठ मिळून कसाबसा संसार चालवीत. दोघांचा वाढता परिवार. या महिन्याची त्या महिन्याला गांठ घालतां घालतां भावाभावांचा जीव टेकीस येई. पण तरीहि सर्व सुखासमाधानांत असत. भावाभावांनीं पैपैसा करून, एक छोटेंसें खपरेल हक्काचें असें उभें केल्यापासून तर साऱ्यांना अस्मान ठेंगणें वाटूं लागलें होतें.

पण परमेश्वराला अल्पसंतुष्ट गरीबांचें थोडकेंसें सुखसुद्धां पाहावत नाहीं कीं काय कोण जाणे ! परमेश्वराचा न्याय मोठा चत्कारिक आहे. जोंपर्यंत असहायपणें मनुष्यप्राणी आपत्तीशीं झगडत असतो व परमेश्वराच्या नांवानें टाहो फोडीत असतो, तोंपर्यंत तो सर्वसाक्षी, सर्वदयाळु परमेश्वर क्षीरसागरांतील आपल्या थंड मऊ, विलासी शय्येवर गोड निद्रेंत गुंग असतो, पण मनुष्यानें स्वकष्टानें जरा का आपल्या आयुष्याची घडी नीटनेटकी बसवली, परमेश्वराला दुवा देत जरासा जर तो सुखाच्या सावलींत विसावला तर परमेश्वराची झोंप उडते, त्याची मत्सरबुद्धि जागृत होते व सुखाचे संसार कसे विसकटावे याबद्दल तो सर्वशक्तिमान् विचार करूं लागतो !

गणपत–महादूच्या संसाराचें असेंच झालें. अगदीं मर्मी झोंबतील असे एकामागून एक घाव परमेश्वरानें गणपतवर घातले.

प्रथम म्हणजे गणपतच्या जिवाचा केवळ लाल असा त्याचा महादू हळूहळू कुमार्गाला लागला.

लहानपणापासून लाडावलेला, स्वच्छंदपणें वागावयास सवकलेला महादू चार पैसे स्वतंत्रपणें हातांत खेळूं लागतांच, व स्वतंत्र अकलेची खूण दाढी-मिसरूड फुटूं लागतांच, हळुहळू भावाशीं गुर्मीनें वागूं लागला होता. त्याला सल्लामसलत देऊन त्याचे कान फुंकण्यास रिकामटेकडे लोक होतेच. सरळ वृत्तीची सगुणा व साधींभोळीं मुलें यांचा सहवास हळुहळू महादूला कंटाळवाणा वाटूं लागला होता. दिवसभरचें काम संपतांच ताडीच्या गुत्त्यांत जाऊन, चार टोळभैरव जिगरदोस्तांबरोबर, झिंगत झिंगत गटारगप्पा हाणण्यांत, अचकटविचकट बोलण्यांत त्याला हळुहळू 'मजा' वाटूं लागली होती. दारूची धुंदी डोक्यांत चढली कीं महादूचे विचार उरफाटत. सगुणेशीं लग्न करण्यांत आपण मोठी चूक केली असें त्याला वाटूं लागे. गोऱ्या कातडीला व नीटनेटक्या नाकाडोळ्यांना भुलून ही भिकारड्याची पोर दादानीं आपल्या गळ्यांत बांधली! एकाद्या मातबर पाटलाची, काळीबेंद्री कां होईना, पण एकुलती एक पोर जर आपण केली असती तर हें भिकारडें, दरिद्री, डुकराचें जिणें आपल्याला कंठावें लागतें ना! असले बेफाट विचार बरळत रात्रींबेरात्रीं महादू घरीं येई. सगुणेला व गणपतला हलकटपणें नाहीं नाहीं तें बोले. झोपेंत असलेल्या बिचाऱ्या पोरांना आदळ आपट करी; व कधीं-कधीं सगुणेला सुद्धां मारहाण करी! दुसरे दिवशीं शुद्धीवर आल्यावर, महादू जरा ओशाळल्यासारखा होई. गणपतनें केलेली कानउघाडणी खालच्या मानेनें ऐकून घेई. सगुणेची दीनवाणी मुद्रा पाहून एखाद अर्धा, इतःपर दारू सोडण्याचा सुविचार त्याच्या मनांत डोकावे. पण अंधार पडला कीं साऱ्यावर पाणी पडे, व त्याचे पाय त्याच्या नकळत गुत्त्याकडे वळत.

गणपतच्या प्रेमळ हृदयाचे, महादूची ही अवनति पाहून तुकडेतुकडे होत. आपल्या सुसंग भावाला दुर्बुद्धि दिल्याबद्दल परमेश्वराच्या नांवानें तो बोटें मोडी.

पण झालें हें कांहींच नव्हे; याहीपेक्षां दारुण दुःख परमेश्वरानें गणपतसाठीं वाढून ठेवलें होतें.

एक दिवस रात्रीं महादूची वाट पहात गणपत अंगणांत येरझारा करीत होता. गांवांत कुठेंतरी तमाशाचा गोंधळ चालला होता. दारू पिऊन तर्रर झालेल्या लोकांची आरडाओरड दुरून ऐकूं येत होती. कुठें तरी मारामारी चालली आहे, असा गणपतला संशय येत होता; व म्हणून महादूबद्दलच्या काळजीनें बाहेरचा सारखा कानोसा घेत; तो अंगणांत फेऱ्या घालीत होता.

एक वाजला, तरी महादूचा पत्ता नव्हता. गणपतचा जीव काळजीनें उडून गेला. इतक्यांत पावलांची चाहूल आली. गणपतनें आशेनें वर पाहिलें. कुंपणांचें फाटक हळूच लोटून, गडग्याच्या बाजूनें दबत दबत कुणींतरी घराच्या मागील दरवाजाकडे जात होतें.

तो महादू खास नव्हता. मग कुणी चोर तर नसेल ? गणपत झपाट्यानें पाऊल टाकीत त्या व्यक्तीच्या अगदीं जवळ गेला. त्यानें न्याहाळून पाहिलें, आणि तो आश्चर्यानें स्तंभित झाला !

दुसऱ्याच क्षणीं भयंकर संतापानें गणपतचें माथें फिरून गेलें.

लाथेखालीं तुडवीत सगुणेला फाटकाबाहेर काढावें, असें त्याला वाटलें.

पण गणपत विचारी पुरुष होता. सगुणेचीं असहाय, लहानलहान मुलें, तिचा आधींच बहकून गेलेला नवरा,—यांची आठवण करून गणपतनें आपलें मन आवरलें. पण अतिशय कठोर शब्दांनीं सगुणेची निर्भर्त्सना मात्र त्यानें यथास्थित करून घेतली.

त्या दिवसापासून तो सगुणेच्या पाळतीवर राहूं लागला. सगुणाहि जरा जपून राहूं लागली. कधीं कधीं मात्र गणपत सगुणेला अपरात्रींची चोरट्या पावलांनीं घरीं येतांना पकडी व तिला अगदीं टाकून बोले. पण सगुणा आपली खोड टाकीना.

बिचारी सगुणा ! लहान, तरुण वय, रूपानें नीटनेटकी, घरांत दारिद्र्याचे चटके, नवऱ्याकडून सुखाच्या एखाद्या गोड शब्दाची सुद्धां आशा नाहीं. अशा स्थितींत भाबडेपणें परक्याच्या गोडगोड बोलण्याला भाळली, त्यानें

दिलेल्या पातळ चोळीला, पुतळीला लालचावली तर तो दोष तिचा कीं परिस्थितीचा बरें ?

पण हे विचार कांहीं गणपतला सुचले नाहींत; तोहि सगळीकडून परिस्थिति उलटल्यामुळें कावल्यासारखा झाला होता. तो सगुणेला उघड उघड घाणेरड्या शिव्या देई व एखादे वेळेस तिच्या अंगावर हात सुद्धां टाकी.

सगुणा चोहोंकडून वणव्यांत फसलेल्या एखाद्या हरिणीप्रमाणें कावरीबावरी होई. एखादे दिवशीं झिंगत झिंगत घरीं आलेल्या महादूनें झोडपावी, तर दुसरे दिवशीं दिरानें पाळतीला राहून, पकडून, विटंबना करावी. शेजाऱ्या-पाजाऱ्यांनीं हंसून कुजबुजून टवाळी करावी. घरांतल्या लहान पोरां-बाळांनीं बुजल्यासारखें तोंडाकडे टकटक पहावें. सगुणेला एखादे वेळेस वाटे, रात्रींचें बाहेर पडावें तें घरींच येऊं नये. आपल्याला काय ददात आहे ? सखाराम आपल्याला कधीं अंतर देणार नाहीं. आपलें रूप, तारुण्य यांनीं सखाराम आपल्या कसा अगदीं मुठींत आहे.

पण सगुणेचें पाऊल वांकडे पडलें म्हणून तिची माणुसकी कांहीं तिला सोडून गेली नव्हती. घरच्या चार असहाय चिमण्या जीवांची आठवण झाली कीं, घराबाहेर पडलेलें तिचें पाऊल झपाट्यानें घरच्या उंबऱ्याकडे वळे.

महादूचें मात्र या सर्व घटनांकडे कांहींच लक्ष नव्हतें. आपल्या नाना तऱ्हेच्या व्यसनांत तो अगदीं गुरफटून गेला होता.

याचा शेवट व्हायचा तोच झाला.

एक दिवस रात्रीं दारूच्या गुत्त्यावर मारामारी होऊन डोकें फुटून महादू घरीं आला,–तो पुन्हां आपल्या पायानें घराबाहेर पडलाच नाहीं.

सगुणेकडून खस्ता खाऊन घेऊन एक दिवस त्यानें जगाला रामराम ठोकला.

बिचाऱ्या गणपतला आकाश फाटल्यासारखें झालें. व्यसनी, नादान कसा कां होईना, पण त्याच्या पाठीशीं उभा त्याचा भाऊ होता. बायकापोरांवर, फाटकें तुटकें कां होईना, पण छत्र होतें.

भावाच्या मरणानें व सगुणेच्या वागणुकीनें हळव्या मनाच्या गणपतनें हाय खाल्ली. पैशाची नेहमींची, आतां तर जास्तच ओढाताण चालली होती. गणपतचें मन व शरीर दिवसेंदिवस टिकाव धरीना. बारीकसारीक दुखण्याचें निमित्त होत होत, गणपत कायमचाच अंथरुणाला खिळला.

दिवसामागें दिवस लोटतां लोटतां गणपतच्या आयुष्याचा शेवटचा क्षण येऊन ठेपला. पण त्याचा प्राण जातां जाईना. स्वतःचीं व भावाचीं मिळून सातआठ लहानलहान मुलें दीनवाणीं, भेदरलेलीं अशीं अंथरुणाभोंवतीं उभीं असलेलीं; साधीभोळी दुबळी बायको; तरणीताठी, देखणी, वांकडें पाऊल पडलेली भावजय,—आणि या सगळ्यांचा एकुलता एक आधार म्हणजे डोक्यावरचें तें मोडकळीस आलेलें खपरेल !

गणपतचा प्राण तडफडत होता. भोंवतालच्या माणसांना त्याचे ते हाल पहावेत ना.

पोरेंबाळें व गणपतची बायको हमसून हमसून रडत होतीं. त्यांतल्यात्यांत सगुणेनें जरा धीर धरला होता. गणपतची सगळ्यांकडे लागलेली केंविलवाणी नजर, सगुणेकडे वळतांच जास्तच आर्त होई. त्याचा आशय कांहींसा ताडून सगुणा पुढें झाली व डोळे पुशीत म्हणाली,

" भावोजी, काळजी करूं नका कुणाचीहि. माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत मी कुण्णाला उपाशीपोटीं राहूं देणार नाहीं, या घरांत. "

गणपतला थोडेसें समाधान झाल्यासारखें दिसलें. पण त्याची तळमळ खरी दुसऱ्याच कांहीं कारणाकरतां होती. मोठ्या कष्टानें एकएक शब्द उच्चारीत तो म्हणाला.

" सगुणा, तुला माझी—, महादूची—, तुझ्या लेकरांची शपथ आहे— तूं पुन्हां सखारामाच्या— "

पुढें त्याला बोलवेना. पण सगुणा काय समजायचें तें समजली. कांहींशा कठोर तर कांहींशा काकुळतीच्या आवाजानें ती म्हणाली,

" नका, भावोजी, भलत्यासलत्या आणा शपथा घालून, आपल्या नी माझ्या जीवाला उगीच तळतळवूं नका. "

गणपत निराशेनें जास्तीच तळमळूं लागला, व असाच तळमळत त्याचा प्राण कुडीबाहेर निघून गेला.

दहा माणसांचा पोशिंदा गेला. सगळीं माणसें, पोरेंबाळें उघडीं पडलीं. घरांतलें किडुकमिडुक विकूनटिकून कसेबसे चार दिवस निघाले; जावाजावांनीं अब्रुभीड गुंडाळून ठेवून चार घरीं मोलमजुरी करायला सुरवात केली. पण खेडेगांवांत काम तें कितीसें मिळणार? तेथें प्रत्येक जण आपल्या पायावर उभा असतो, व हातपाय धडधाकट जरी नसले, तरी मजुरीनें माणसें ठेवायला कुणाला परवडणार?

रात्रंदिवस राबूनहि जावाजावांना पोरांच्या पोटापुरतें सुद्धां मिळेना.

सगुणेचा जीव तळमळे. आपण दीराला दिलेल्या आश्वासनाची तिला आठवण होई. " माझ्या जिवांत जीव आहे तोंवर मी या घरांत कुणाला उपाशीपोटीं राहूं देणार नाहीं. " प्रामाणिकपणें शरीर झिजवून तिनें पाहिलें. पण जग न्यायाचें, नीतीचें नाहीं! तसें तें असतें, तर नीतीचा मार्ग सोडून, जगाच्या दृष्टीनें अनीतीचा मार्ग तिला स्वीकारावा लागला नसता.

एक दिवस रात्रीं, सर्व स्वस्थ निजलीं आहेत, असें पाहून सगुणेनें, दीर गेल्यानंतर प्रथमच, घराबाहेर पाऊल टाकलें.

" भावोजी, " अंगणांत उभे राहून, घराकडे तोंड करून ती हळूच म्हणाली. " माफ करा. शक्य तोंवर मी तुमची शेवटची आज्ञा पाळण्याचा प्रयत्न केला. पण—आतां–आतां–दुसरा मार्गच उरला नाहीं—हें तुम्ही पहातां ना? "

दुसरे दिवशीं सकाळीं भीतभीत दहा रुपये सगुणेनें आपल्या जावेपुढें ठेवले व म्हटलें,

" बाई, हे खर्चायला घ्या. धान्यधुन्य आणवा— "

ती चकचकणारी छोटीशी रास पाहून सगुणेच्या जावेचे डोळे आनंदानें

लकलकले. पण दुसऱ्याच क्षणीं तिला एक शंका येऊन तिनें चटकन् सगुणेकडे रोखून पाहिलें. सगुणेनें मान खालीं घातली. जळत्या डोळ्यांनीं, थरथरणाऱ्या हातांनीं, जावेनें रुपये उचलून सगुणेच्या तोंडावर फेंकले.

दोघींचे पदर पाण्यानें भिजून चिंब झाले.

उपाशीतापाशी पोरेंबाळें चिमणीसारखीं तोंडें करून उघडीं नागडीं उन्हां-तान्हांत वणवण करीत फिरूं लागलीं.

पुन्हां कांहीं दिवसांनीं जेव्हां सगुणेनें जावेपुढें रुपये केले, तेव्हां जाऊ संतापली, रडली–पण तिनें रुपये फेकून दिले नाहींत.

पोरेंबाळें अन्नाला लागलीं.

सखाराम हळुहळू उघडपणें सगुणेकडे जाऊं लागला. साऱ्या गांवांत नाचक्की झाली.

पण सगुणेला रिकामटेकड्या गांवगप्पांची कांहींच क्षिती वाटत नव्हती. फक्त एकाच विचारानें ती तळमळली. "गणपतनें आपल्याला क्षमा केली असेल कीं पोटाची भूक शमवण्यासाठीं नीतीचे बंध तोडले म्हणून तो आपल्यावर रागावला असेल, कां उपाशीं मरत असलेल्या साऱ्या घराला आपण वांचवलें म्हणून कृतज्ञतेनें, कौतुकानें आपल्याकडे पहात असेल ?"

बाकी, साऱ्या समाजांना ज्या प्रश्नाचें उत्तर अजून निश्चितपणें देतां येत नाहीं, त्या प्रश्नाचें उत्तर गणपत किंवा सगुणा, काय देणार ?

## सरला

## ७

तसा अशोक कांहीं नेहमींच दुर्मुखलेला असे असें नाहीं. त्याच्या मित्र-मंडळींत तर तो आनंदी प्राणी म्हणून प्रसिद्ध होता. अशोक आपल्या दोस्तांच्या कंपूंत एकदां बसला कीं विनोदसागराला नुसती भरती यायची! घरची सांपत्तिक स्थिति आपली अशीतशीच; पण अशोकच्या उत्साहाला त्यामुळें कधीं विरजण लागलें नाहीं. तो आपल्या साहित्यसंसाराच्या निरागस आनंदांत नेहेमीं निमग्न असायचा. एखाद्या खवचट टीकाकारानें त्याच्यावर एखादे वेळेस खरमरीत टीका केली तरी अशोकनें त्याचा कधींच विषाद मानूं नये; उलट त्या टीकेवरच कोट्या-प्रतिकोट्या करून त्यानें हास्याचे मजल्यावर मजले चढवावे!

पण त्या दिवशीं मात्र अशोकची मुद्रा अगदीं त्रासल्यासारखी दिसत होती. आपलें लेखनाचें बाड पुढें घेऊन व फाऊंटनपेन सरसावून तो कितीतरी वेळ अगदीं स्तब्ध बसला होता. पण सरस्वतीदेवी त्याला प्रसन्न

होईना. नेहमीं अशोकच्या लेखणीची व कागदाची गांठच पडायची खोटी असे. एकदां सुरवात झाल्यावर ओळीवर ओळी व स्तंभावर स्तंभ गर्दी करूं लागायचे. अशोकचें हस्ताक्षर तसें वळणदार होतें. पण आपल्या सशासारख्या चपळ कल्पना भराभर कागदावर उतरतां उतरतां त्याचीं अक्षरें अपुरीं व अस्पष्ट होऊं लागत. अशोकचें कच्चें हस्तलिखित वाचायची कुणाहि संपादकाची छाती झाली नसती. अशोकला स्वतः नेटकें हस्तलिखित करण्याचा कंटाळा येई. नव्या नव्या कल्पना, नव्या नव्या रूपानें रेखाटणाऱ्या लेखणीला, स्वतःचीच पुन्हां निरर्थक नक्कल करायला कसें आवडावें ? मासिकांचे संपादक पत्रें लिहून लिहून ( व अशोक तीं वाचून वाचून ) कंटाळले कीं अशोकनें आपलें एखादें हस्तलिखित आपल्या पत्नीच्या अंगावर फेकून म्हणावें—“ सरू, लागतंय् का तुला हें ? बघ ग ! ”

आपल्या हस्ताक्षराबद्दल कांहीं अशोक साशंक नसे; पण सरला बेताचीच शिकलेली होती. तेव्हां तिला तें हस्तलिखित उकलतां यायचें नाहीं कदाचित् असें त्याला वाटे. सरलेनें ते कागद किती हळुवारपणें व आदरानें उचलून घ्यावे ! जसें कांहीं एखादें बकुळीचें फूल किंवा नुकतेंच जन्मलेलें तान्हें बाळ. तिचे डोळे आनंदानें व कृतज्ञतेनें चमकत. सकाळपासूनच्या कामकाजानें दमलेंभागलेलें अंग दुपारचें जरा आडवें करण्याचें सोडून तिनें टेबलापाशीं ताटकळत तासन्‌तास बसावें व गुंतलेल्या मोत्यांच्या सरांतल्या दाण्यासारखा एक एक शब्द जपून लिहून काढावा. सरलेनें केलेलें नेटकें हस्तलिखित अशोक वाचूं लागला कीं सरलेनें दाराआड उभें राहून उत्सुकतेनें त्याच्या मुद्रेवरील भाव न्याहाळावे. ‘ सगळं कांहीं ठीक आहे ’ अशा अर्थाची मान डोलवीत अशोकानें-लिफाफ्यांत कागद घातले म्हणजे सरलेला धन्य धन्य व्हावें.

पण नेहमीं हरणासारख्या, चपळ उड्या टाकीत चालणारी त्याची लेखणी आज कितीतरी वेळ खुंटून उभी राहिली होती—किंबहुना अशोकनें तिला मुद्दाम थोपवून धरलें होतें म्हणाना !

आजच्या कादंबरीची सुरवात आणि पुढचेंहि तिचें सारें लिखाण अशोकला फार काळजीपूर्वक करायचें होतें. एका उदार नवकोट-नारायणानें ठेवलेलें उत्तम मराठी ग्रंथाबद्दलचें प्रतिवार्षिक ‘ कालिदास ’ बक्षीस ललितलेखनाच्या कधींच वांट्यांस येत नाहीं याबद्दल त्याच्या मित्रमंडळींत तीनच दिवसांपूर्वी मोठा वाद झाला होता. तेव्हां अशोक म्हणाला होता,

“ परीक्षा समितींतील विद्वान् तज्ज्ञांना दोष द्यायला तयार नाहीं मी मुळींच. आपलं ललितलेखन तितकं बावनकशी नसतं. मराठी कादंबरीच्या संसाराकडे जरा लक्ष देऊन पाहा. परमोच्च बिंदु गांठणारा एक तरी कलावंत दिसतो का ? सगळे मायामृगाला भाळून भलतीकडेच भटकतांना आढळतात. कुणी दिखाऊ सौंदर्याच्या भजनीं लागतो, तर कुणी फॅशनेबल बनलेल्या बड्या तत्त्वांना लोकप्रियतेसाठीं कसंतरी आपल्या कादंबरींत कोंबतो ! कुणी नवनीतीच्या नांवावर निर्लज्ज बनण्याचा चंग बांधतो, तर कुणी गूढगुंजन करतां करतां स्वतःच गौडबंगाल गुपित बनून जातो. कुणी स्त्री-कैवाराच्या वास्तवात्मक गोष्टी करतां करतां असंभाव्यतेचे पंख लावून आकाशांत भराऱ्या मारतो, तर कुणी बोधामृत पाजायच्या मिषानं पांचट गुऱ्हाळ लावून बसतो. ” बोलतां बोलतां ईर्षेला चढून अशोकानें त्या वर्षाचें बक्षीस आपल्या एका नवीन कादंबरीवर मिळविण्याची प्रतिज्ञा केली.

त्या दोन दिवसांत अशोकच्या नवीन कादंबरीचें कथानक त्याच्या मनांत सुसंघटित होण्यास झटत होतें. वेळ फारच थोडा होता. मनाचे मनोरे फार दिवस उभवीत बसायला अवधि नव्हता. शेवटीं तिसऱ्या दिवशीं दुपारीं पहिलें प्रकरण लिहून काढायच्या संकल्पानें अशोक टेबलापाशीं बसला.

आरंभींची पार्श्वभूमि त्यानें मनांतल्या मनांत रेखाटली व आपल्या अधीर लेखणीचा लगाम खेचून पहिल्याच प्रकरणांत आकर्षक रीतीनें प्रवेश करणाऱ्या आपल्या नायिकेचें चित्र पूर्णांगानें तो मनांतल्या मनांत तयार करूं लागला.

तें कांहीं त्याला नीटसें—मनाजोगें—साधत नव्हतें. आणि नेहमींचा हंसत-

मुख, उत्साही, विनोदी अशोक त्या वेळीं त्रासल्यासारखी चिडलेली मुद्रा करून बसला होता.

इतक्यांत दारावर टक्टक् झालें व त्याचा मित्र विजय हळूच दार किलकिलें करून आंत डोकावला. एरवीं लेखनकार्य चालू असतांना कुणीं असा व्यत्यय करायला आलें असतें तर अशोक अगदीं चिडून गेला असता व त्याची चिडलेली मुद्रा पाहून एकदोन औपचारिक गोष्टी बोलून आगंतुकानें काढता पाय घेतला असता. पण निष्फळ अशा अतिविचारानें त्रासलेल्या अशोकाला त्या दिवशीं मित्राचें—व त्यांतून अशा जिवश्चकंठश्च मित्राचें—आगमन अत्यंत इष्टच वाटलें. चटकन् फाउंटनपेन टेबलावर टाकून देऊन खुर्चीला गरकन् एक गिरकी देऊन तो म्हणाला,

" ये ना विजय, ये. किती दिवसांनीं आलास हा ! "

असें स्वागत झालेलें पाहून विजयला हायसें वाटलें व टेनिसची रॅकेट बाजूला ठेवून एका आरामखुर्चीत त्यानें आपलें अंग अल्लद सोडून दिलें. गप्पांच्या बैठकीला चांगला रंग चढावा म्हणून खुर्चीत पडतां पडतां त्यानें आरोळी ठोकली, " वहिनी, चहा बनवा हो फक्कडसा. "

विजय अशोकचा कांहीं वाङ्मयीन मित्र नव्हता. ते दोघे खरे शाळासोबती. अशोकचे बाकीचे सहाध्यायी कीर्तिशैलावर झपाट्यानें चढणाऱ्या अशोकच्या मागें पडले व अशोक त्यांना विसरूनसुद्धां गेला. पण विजयशीं मात्र अशोकचा स्नेह टिकून राहिला होता व दिवसेंदिवस वृद्धिंगत होत होता. दिलदार व खेळकर वृत्तीच्या विजयनें अशोकला आपलेसें करून घेतलें होतें. स्फुरण, चिंतन व लेखन या त्रिपुटीनें मस्तक शिणलें म्हणजे विजयच्या सहवासांत त्याचा श्रमपरिहार होई. वाङ्मयाविरहित दुसऱ्या कुठल्याहि विषयावर विजयला म्हणजे बोलायला येत नाहीं असें नसेच; व वाङ्मयीन विषयांच्या चर्चेची अपेक्षा विजयकडून अशोक करीतहि नसे.

पण आज मात्र इकडच्या तिकडच्या चारदोन गप्पा झाल्याबरोबर अशोकनें

आपल्या लेखनाच्या गोष्टी काढल्या. विजय आश्चर्यचकितच झाला! पण कांहींसा अभिमानहि वाटला त्याला. मोठ्या उत्सुकतेनें तो ऐकूं लागला—

" एक नवीन कादंबरी लिहावयास घेतली आहे मीं. " अशोक म्हणाला.

" अस्सं. कुठपर्यंत आलीय्? काय घेतला आहेस मुख्य विषय?"

" अरे, कुठपर्यंत कसली? सुरवातच कशी करावी तें सुचतच नाहीं बघ!"

" वा वा असं कुठं झालंय्? कांहींतरी बोलतो आहेस झालं. तुझ्यासारख्या वाङ्मयतपस्व्यानं असं म्हणावं?"

" अरे खरंच, चेष्टा नाहीं करीत मी!"

" मग अडलंय् कुठं तट्ट्ट तुझं तें तरी कळूं दे!"

" हं, तेंच तर सांगतों ना तुला आतां. बघ कांहीं मदत करीत असलास तर!" विजय 'आ' करून पाहातच राहिला. पण त्याची छाती मात्र अभिमानानें तट्ट फुगली जशी.

" हें बघ—" अशोक सांगूं लागला. " ही कादंबरी मी त्या प्रसिद्ध 'कालिदास' बक्षिसासाठीं पाठवणार आहें. तेव्हां लिहितांना कुठंहि चाल-ढकल करून उपयोगी नाहीं. कादंबरीची रूपरेखा एकंदरीनं अगदीं काळजी-पूर्वक तयार केली आहे मीं. नायक, खलनायक सगळी अगदीं जय्यत तयारी आहे. पण कादंबरीचा जसा कांहीं प्राणच अशी जी नायिका तिचं चित्र माझ्या नजरेसमोर राहावं तसं उभंच राहात नाहीं अजून. आणि माझा तर असा शिरस्ता आहे, कीं पूर्णांशानं गोष्टींतील व्यक्ति माझ्या मनांत तयार झाल्याशिवाय तिच्या वर्णनाला मी हातच घालीत नाहीं. एखाद्या मूर्ति-कारासारखी माझी वर्णनाची पद्धत आहे म्हणेनास. तो जसा आपलं मॉडेल आपल्यासमोर आणून बसवतो व नंतर त्याबरहुकूम एकएक अवयव घडवीत जातो ना, तसंच!"

विजय स्तब्ध बसून ऐकत होता. शेवटीं स्तब्ध बसण्याचा कंटाळा येऊन म्हणा, आपण साहित्याच्या बाबतींत अगदींच अडाणी आहोंत असें अशो-

काला वाटूं नये म्हणून म्हणा किंवा अशोकाची मूर्तिकाराची कल्पना त्याच्या बुद्धीला एकदम पटली म्हणून म्हणा, विजय बोलूं लागला, " मग असं कर ना! तुझ्या माहितीच्या तुला हव्या तशा एखाद्या स्त्रीला मनांत आण आणि मग घडव तुझी नायिका त्या चित्राप्रमाणं."

" असंच करीत असतों नेहमीं मी. पण आज तशी कुणी व्यक्ति लक्षांतच येत नाहीं बघ." व्यग्र स्वरानें अशोक म्हणाला, " आज दोन दिवस डोकें खाजवून, स्मरणशक्तीला कल्पनाशक्तीची जोड देऊन सारखा प्रयत्न करतोंय्. पण मला हवी तशी मूर्ति स्फूर्तच होत नाहीं!"

" तशी म्हणजे कशी? कशी नायिका हवी आहे तुला?"

" तें सांगाय्साठीं तर हा विषय आतां मीं काढला तुझ्याजवळ. तूं मोठमोठ्या श्रीमंत, सुशिक्षित, सुसंस्कृत लोकांत वावरतोस. तेव्हां मला हवी तशी स्त्री कदाचित् तुझ्या पाहाण्यांत असेल."

लटक्या विनयानें विजयनें संकोचल्यासारखें दाखविलें; पण आतां दुप्पट लक्षपूर्वक तो अशोकचें बोलणें ऐकूं लागला.

" हें बघ, माझी नायिका आजकालच्या शेंकडा शंभर कादंबऱ्यांतून आढळणारी नुसती सुंदर, फॅशनेबल बाहुली व्हायला नको आहे मला. बाहेरून ती चार सामान्य बायकांसारखी दिसली तरी चालेल."

" आलं लक्षांत." विजय म्हणाला व त्याच्या डोळ्यांसमोर उभ्या राहिलेल्या दोनचार लावण्यलतिकांना त्यानें मान हालवून जणूं जाण्याचा इषारा केला! " नगाचं वर्णन इंदुबिंदुछाप! हं बोल पुढं."

" असा पोरकटपणा करणार असलास तर नाहीं सांगत जा." लटक्या रोषानें अशोक म्हणाला.

" बरं नाहीं. गंभीर होतों हं आतां अगदीं."

आपलें दोन्ही हात एकमेकांत अडकवून ते टेबलावर ठेवून विजयानें गंभीरपणानें विचारलें, " साधारणपणानं तुझ्या नायिकेंत कायकाय गुण असावेत याची कल्पना देशील काय?"

" ऐक तर मग, विजय, माझ्या नायिकेच्या बहिरंगापेक्षां तिचं अंतरंग सुंदर असावं. ती रूपवती नसली तरी चालेल; पण गुणवती असावी. आतां तूं विचारतोस ते गुण निश्चित करणं फार कठीण काम आहे. अरे काळ पालटतो तसं गुणांचं रूपहि पालटतं. आदर्श पत्नी समजली जाणारी गड-कऱ्यांची सिंधु आतांशा शाळा-कॉलेजांतल्या पोरांच्या टीकेचा विषय होऊन राहिली आहे ! पूर्वीचा आज्ञाधारकपणा आतांचा बावळटपणा ठरतो; पूर्वीचा नम्रपणा आत्मसंयमनाचा अभाव ठरूं लागला आहे. अशा स्थितींत काळ ज्याचं स्वरूप पालटूं शकणार नाहीं असा एक गुण मीं निवडून काढला—"

" आणि तो म्हणजे– " विजय उत्सुकतेनं म्हणाला.

" निःस्वार्थीपणा ! स्वार्थत्याग हा सर्व गुणांचा सम्राट आहे असं नाहीं तुला वाटत ? त्याचं साम्राज्य त्रिकालाबाधित आणि सर्वव्यापी आहे. "

" मग असं कर, " विजय म्हणाला, " एखाद्या स्वार्थत्यागी देशसेवि-केला कर नायिका तुझी. आहेत माझ्या ओळखीच्या एकदोन. उद्यांच हवी तर ओळख करून देतों तुझी त्यांच्याशीं. "

" अं हंः ! विजय ! " अशोक मान हालवून म्हणाला, " माझ्या नायि-केचा स्वार्थत्याग शुद्ध बावनकशी असला पाहिजे. देशसेवक आणि सेवि-कांच्या स्वार्थत्यागांत लौकिकाच्या हवेचा हिणकसपणा नसेल कशावरून ? मूळचं पितळ असून केवळ जीवनकलहाच्या प्रखर आचींतून वांचल्यामुळं सुखासीनपणानं चमचम् करून मिरवणारं सोनं काय थोडं पाहातों आपण व्यवहारांत ? माझ्या नायिकेच्या स्वार्थत्यागाला गवगवा व देखावा सोसणार नाहीं. तिच्या स्वार्थत्यागापासून तिला स्वतःला काडीचं सुख लागणार नाहीं. चंदनाप्रमाणं झिजून दुसऱ्याचं हित साधायला ती झटेल. पण त्या दुसऱ्या व्यक्तींना मात्र तिच्या कार्याची, तिच्या उपकाराची जाणीवहि नसेल. दुस-ऱ्यांच्या गुणोत्कर्षासाठीं ती स्वतःचे गुण मातींत घालील ! पण ते दुसरे तिच्या जिवावर आपण जगत आहोंत याची आठवणहि न ठेवतां स्वयं-प्रकाशी म्हणून मिरवतील व तिला तुच्छ लेखतील. "

अशोक आपल्या नायिकेचें वर्णन करण्याच्या अगदीं भरांत आला होता; विजय त्याचें बोलणं ऐकण्यांत अगदीं तल्लीन होऊन गेला होता. इतक्यांत चहा व खायचें एका ट्रेमध्यें घेऊन सरला खोलीमध्यें आली.

या व्यत्ययानें अशोकचा रंगभंग होऊन कांहींसा चिडल्यासारखा तो एकदम बोलायचा थांबला. अशोकच्या या भावनेची जाणीव होऊनच कीं काय सरला शक्य तितक्या पटापट कप व बशा ट्रेमधून काढून टेबलावर मांडीत होती.

विजयनें तिच्याकडे पाहिलें आणि एकदम कांहीं नवेच विचार त्याच्या डोक्यांत सुरू झाले.

अगदीं थोड्या वेळांत सरलेनें कितीतरी पदार्थ बनवले होते. तिचा चेहरा घामेजलेला व दमलेला दिसत होता. बिजयला वाटलें, "आपण दोघे आरामखुर्चीवर चैनींत पडून रिकामा काथ्याकूट करीत होतों आणि वहिनी मात्र आमच्यासाठीं लगबगीनं घरांत चहाफराळाचं करीत होत्या."

बटन दाबल्याबरोबर जसा विजेचा पंखा झरझर फिरूं लागतो, तसें त्या एका विचाराबरोबर विजयच्या डोक्यांत एक विचारचक्र सुरू झालें.

अशोक-सरलेच्या साऱ्या संसाराचें मूळापासूनचें चित्र त्याच्या डोळ्यांसमोर उभें राहिलें. सरलेचें लग्न झालें तेव्हां दुसऱ्या एल्एल. बी.ला अशोक बसला होता. आपला जांवई वकील होऊन ओझ्यावारी पैसे मिळवील व मोटारींतून बायकोला लक्ष्मीसारखी सजवून फिरवील या आशेनें सरलेच्या आईबापांनीं पुष्कळ हुंडापांडा देऊन मुलगी या स्थळीं दिली. सरला मोठी सुंदर नव्हती; पण शंभर बायकांत उठून दिसेल अशी नीटस होती, ती पदवीधर विदुषी नव्हती; पण सुबुद्ध व चाणाक्ष होती. बालवयाला साजेलशी नटण्यामुरडण्याची, नीटनेटका संसार थाटायची, चारचौघींत ऐटीनें मिरवण्याची हौस तिला होती. पण अशोकनें सनद न काढतां लेखणी हातांत धरून 'दरिद्री-नारायण' होण्याचें पतकरलें व सरलेच्या सगळ्या हौसेमौजेवर पाणी पडलें. पण सरलेनें याबद्दल एक दिवसहि कधीं विषाद दाखवला नाहीं. स्वतः लेण्यामिरवण्याची

हौस बाजूला ठेवून पतीच्या वाढत्या कीर्तींत ती भूषण मानूं लागली. पतीच्या बेताच्या मिळकतींतच आपला संसार नेटका थाटायची तिनें तयारी केली. वाढता संसार गरिबींत चालवायचा म्हणजे किती शारीरिक व मानसिक त्रास सोसावा लागतो ! अशोकच्या वाङ्मयीन प्रतिभेला या त्रासाची धग एक दिवसहि सरलेनें लागूं दिली नाहीं. नित्यनैमित्तिक, दुखणींबाणीं, पै-पाहुणा, सगळा संसाराचा गाडा एकट्या सरलेनें ओढावा व अशोकला त्याच्या लेखनकार्यासाठीं आराम व मानसिक स्वास्थ्य मिळवून द्यावें.

पण अशोक—अशोकला आपली पत्नी आपल्यासाठीं काय कष्ट करते आहे याची दादहि नव्हती. उलट आपल्या प्रतिभेला साजेशी रसिक, आपल्या बरोबरीनें काव्यशास्त्रविनोदांत भाग घेणारी पत्नी आपल्याला मिळाली नाहीं म्हणून तो नाखूष होता. वाङ्मयाच्या उच्च वातावरणांत विहार करायचं सोडून डाळ, तांदूळ, कपडालत्ता, आलागेला—अशा क्षुल्लक गोष्टींत कालापव्यय करणाऱ्या सरलेचा त्याला तिटकारा येई.

पण विजयला वाटलें, सरलेनें जर या क्षुल्लक गोष्टींची काळजी वाहिली नसती, तर अशोक इतका प्रथितयश लेखक झालाच नसता !

हे सारे विचार एका निमिषांत विजयच्या डोक्यांत येऊन गेले. तो एकदम अशोककडे वळला आणि म्हणाला, " हें बघ, तूं सरलावहिनींनाच कां नाहीं नायिका बनवीत तुझ्या या कादंबरीची ? "

" कुणाला, सरूला ? हेऽऽ "

किती हेटाळणीचा व तुच्छतेचा स्वर होता तो ! सरलेचें काळीज कापीत गेला तो. तिचें तोंड गोरेमोरें झालें. तिनें झटकन् रिकामा ट्रे उचलला व ती बाहेर जाऊं लागली. त्या दोघांच्या नजरेसमोरून आपण केव्हां एकदां निघून जाऊं असें तिला झालें असावें.

विजयहि वरमला. आपण कांहींतरीच बोललों असें अशोकच्या हेटाळणीच्या स्वरानें त्याला वाटलें. काय म्हणेल अशोक आपल्याला ? कधीं नव्हे तो साहित्याच्या गोष्टी आज आपल्याशीं अशोक बोलला आणि आपण

पालथ्या घड्यावर पाणी ओतल्यासारखें शेवटीं कांहींतरी बोलून सारें फुकट दवडलें !

अगदीं गोंधळून गेला तो. काय बोलावें तें कळेनाच त्याला. भराभर बटाटे-पोह्यांचे चारपांच चमचे तोंडांत टाकून तो म्हणाला,

" किती नामी साधलेत पोहे, नाहीं ? "

विजयनें आपल्या मतें विषय बदलला होता; पण अशोक पुन्हा उपहासाच्या स्वरानें म्हणाला,

" पण पोहे किती सुंदर बनवले तरी त्यामुळं कांहीं नायिका होण्याची पात्रता येत नाहीं अंगांत ! "

जास्तच ओशाळला विजय. कढत चहाचे घोट भराभर घेत तो मनाशीं म्हणाला,

" मग कशानं येते बरं ? छे, अगदींच अडाणी आहें मी. मघाशीं नायिकेबद्दल अशोक काय सांगत होता तें कांहींच आठवत नाहीं मला आतां. एकंदरींत या वाङ्मयाच्या गोष्टी मोठ्या भानगडीच्या खऱ्या. टेनिसचे चेंडू झोलावण्यासारखं कांहीं सोपं सरळ काम दिसत नाहीं हें ! "

[ ' ऑल इंडिया रेडिओ, मुंबई'च्या कृपेनें ]

## पतिव्रता

## ८

" आई अंबाबाई नवसास पावली; येत्या मंगळवारीं जोगेश्वरीची ओटी खणा नारळानें भरवली पाहिजे लक्ष्मीकडून. " पार्वतीकाकू गहिंवरलेल्या आवाजानें म्हणाल्या व त्यांनीं आपल्या डोळ्याचें पाणी पदरानें पुसून काढलें.

" अग पण हो आई जरा ' किंचित् हंसत पण बऱ्याचशा तिरस्कारानें भास्करराव ओरडले. " सगळं नीट ऐकून तर घेशील ? अडचणी आहेत सतराशें त्याच्यांत. बाबासाहेबांनीं दहा हजार रुपये दिलेत पण ठेवलेत ते लेकीच्या नांवावर. जावयाच्या नाहीं कांहीं. "

भास्कररावांच्या गुरकावणीनें किंचित् दचकलेल्या पार्वतीकाकू पुन्हां हंसून म्हणाल्या,

" हात्तिच्या, एवढेंच ना. म्हटलें अडचण आहे म्हणतोस ती कसली एवढी ? अरे, लक्ष्मीच्या नांवावर काय, नि तुझ्या काय, एकच. "

" एकच ! एकच बरं असेल." कपाळाला आंठ्या घालून भास्करराव म्हणाले. " ते दिवस गेले आई जुने. "

" म्हणजे रे काय नाना ? " आश्चर्यानें पार्वतीकाकू म्हणाल्या.

" अग, दुसरं तिसरं कांहीं नाहीं. जुन्या काळीं पुरुषांच्यापुढें ब्र काढण्याची बायकांची प्राज्ञा नव्हती. नवरा म्हणेल तें आपलं मुकाट्यानं करायचं— "

" हं, हं, हें खरं रे ऽऽ बाबा " मांजराला लोण्याचा गोळा दिसला म्हणजे तें जितक्या आनंदानें त्याच्यावर झडप घेतें तितक्याच आनंदोत्सुकतेनें पार्वतीकाकूंनीं या विषयावर झडप घेतली. " अरे पूर्वीच्या काळच्या बायका काय अजागळ वेडीपिरं एकेक. अंगीं कांहीं अक्कल असेल तर ना नवऱ्यापुढें बोलतील ? आतांच्या बायका शहाण्या झालेल्या असतात बाबा, शिकून सवरून— "

पार्वतीकाकूंचें व्याख्यान आणखी कांहीं वेळ पुढें चाललें असतें पण तेवढ्यांत लक्ष्मी स्वयंपाकघरांतून आपल्या दोन वर्षांच्या मधूला घेऊन बाहेर आली. लक्ष्मी मूळची चांगली असावी. पण सध्यां तिचा चेहरा अगदीं फिक्कट दिसत होता. तिच्या डोळ्याभोंवतीं दोन काळीं वर्तुळें पडलीं होतीं आणि तिच्या मूळच्या नितळ भालप्रदेशावर चिंतेनें आपलें ठाणें बसवलें होतें. तिच्या काळ्याभोर केशकलापांत पांचसहा पांढरे केस अकालींच डोकावूं लागले होते. लक्ष्मी मंद मंद पावलें टाकीत जमिनीकडे नजर लावून सासूजवळ आली. शेजारीं बसलेल्या भास्कररावांकडे एकवार तिनें नजर वर उचलून पाहिलें. तिच्या फिक्कट चेहऱ्यावर रागाची लाल छटा आली व तिच्या कपाळाला आंठ्या पडल्या.

" मधूकडे बघणार जरा ? " जड स्वरानें लक्ष्मी म्हणाली. " पान वाढायची वेळ झालीय्. त्याला कांहीं जेवायला नाहीं घालायचंय् आतां. त्याचं पोट बिघडलंय् जरासं. बाहेरच जरा संभाळावा. नाहींतर उगीच रडत बसेल. "

जेवायला झाल्याबद्दलची ही सूचना ऐकून भास्करराव मुकाटयानें उठले व हातपाय धुऊन पाटावर जाऊन बसले. पत्नीचा तो उदास पण क्रुद्ध चेहरा पाहून ते जरासे दबकलेच होते. लक्ष्मीबाई मुकाटयानें वाढूं लागल्या. मधूला घेऊन पार्वतीकाकू शेजारीं गेल्याचें पाहून लक्ष्मीबाईनीं बोलण्यास सुरुवात केली. पतीच्या चेहऱ्याकडे एकवार तीव्र नजरेनें पाहून व एक प्रकारचें रुक्ष, उदास हसून त्या म्हणाल्या—

" काय चालला होता विषय मघाशीं ? मधूच्या गोंधळांत मला ऐकूं नाहीं आलं नीटसं. "

" छे, तसं कांहीं नाहीं विशेष " भास्करराव चाचरत म्हणाले.

" तरी पण ? " स्वर किंचित् चढवून लक्ष्मीबाई म्हणाल्या.

नाइलाजानें भास्कररावांनीं उत्तर दिलें—

" बाबासाहेबांनीं दहा हजार रुपये तुझ्या नांवावर ठेवल्याचें आईला सांगत होतों— "

" आणि मग ? "

" आणखी कांहीं नाहीं. आई म्हणत होती— "

" पुरे, पुरे " लक्ष्मीबाई म्हणाल्या. त्यांचा आवाज त्यांच्या इच्छेविरुद्ध रुद्ध होत होता. " मीं ऐकलं सगळं. बायकोचा पैसा तो नवऱ्याचा नव्हे, शिकलेल्या बायका नवऱ्याच्या मुठींत नसतात आणि... " पुढें लक्ष्मीबाईंना बोलवेना.

" लक्ष्मी " भास्करराव जेवतांना हात थांबवून म्हणाले " मी तुझ्या-बद्दल असं म्हणेन हें शक्य तरी आहे का ? आज चार वर्षें मी तुला पहातों आहे ना ? "

लक्ष्मीबाईनीं डोळे पुसले.

" पण आपणहि कायसंसं असंच म्हणायचं होतं, खरं ना ? "

" हो," भास्करराव शरमून म्हणाले. " लक्ष्मी, उद्वेगाच्या भरांत मी तसं बोलून गेलों खरा पण तें कांहीं खरं नव्हे. "

" उद्वेगाच्या भरांत ! " भावी आपत्तीच्या दर्पानें गुदमरून जाऊन लक्ष्मी म्हणाली, " कसला उद्वेग आला होता एवढा ? "

" लक्ष्मी, काय सांगूं तुला आतां ! " भास्करराव केविलवाण्या आवाजानें म्हणाले व त्यांनीं आपल्या धोतराच्या सोग्यानें आपले डोळे पुसल्यासारखें केलें.

तरीही लक्ष्मीचा चेहरा कठोरच राहिला. लक्ष्मी कांहीं मूळची कठोर अंतःकरणाची नव्हती. पतीच्या या अशा आविर्भावानें कितीतरी वेळां तिचें मन द्रवून गेलें होतें. तिनें आपल्या अंगा-खांद्यावरचें या नाटकाला फसून कितीवेळां तरी मुकाट्यानें काढून दिलें होतें. आपल्या लाडक्या बाळाचें बाळलेणें नाहींसें केलें होतें आणि आपला मूळचा मानी स्वभाव बाजूला ठेवून आपल्या श्रीमंत बापापाशीं पैशासाठीं अनेक वेळां तोंड वेंगाडलें होतें. पण दिवसेंदिवस तिचा पतीवरचा विश्वास उडत चालला होता. ती म्हणाली—

" कांहीं नको सांगायला. नेहमींचीच हकीकत ना ? ठाऊक आहे सगळी मला ती. "

भास्करराव ओशाळले आणि चिडलेही. ते पुन्हां कांहीं बोलणार तोंच पार्वतीकाकू ओटीवर आल्याची त्यांना चाहूल लागली. मुकाटयानें ते उठून आंचवायला गेले व लक्ष्मी आपलें पान वाढून घेऊं लागली.

ती सारी रात्र भास्कररावांच्या व लक्ष्मीच्या डोळ्यास डोळा लागला नाहीं. भास्कररावांनीं लाजलज्जा बाजूला ठेवून पुन्हां पुन्हां आपली रडकथा लक्ष्मीच्या पुढें गाईली. त्यांच्या सबबी ठराविक असत. एका मित्रानें फार मोठ्या अडचणींत सांपडल्यामुळें आपल्यापाशीं हातउसने पैसे मागितले, आपल्या हातांत पैसा नसल्यामुळें ते आपण ऑफिसच्या तिजोरींतून उचलले, दुसऱ्या दिवशीं हिशेब तपासणी होणार ही अशी हकीकत प्रत्येक वेळां ते लक्ष्मीला सांगत. लक्ष्मी बिचारी काय करणार ? वेळ आणीबाणीची असल्यामुळें ती

मुकाटयानें एखादा डाग भास्कररावांच्या हवालीं करी किंवा बापापासून पैसे आणी. पण आज मात्र तिनें कांहींही करण्याचें साफ नाकारलें.

" लक्ष्मी " निराशपूर्ण व खिन्न स्वरानें शेवटीं भास्करराव म्हणाले " ही वेळ उगाच ओढून धरण्याची नव्हे. आणि शिवाय या वेळेला तुला कांहीं दागदागिना मोडायला नको किंवा दुसऱ्या कोणापाशीं शब्दही टाकायला नको. तुझ्या बाबासाहेबांनीं थोडेथोडके नाहीं, चांगले दहा हजार रुपये तुझ्या नांवानें बँकेंत ठेवले आहेत. त्यांतले दे म्हणजे झालें—मला सवड होईल तसतसे मी तुझे परत करीन— "

पतीचे हे शेवटले शब्द लक्ष्मीच्या हृदयांत एखाद्या शल्याप्रमाणें टोंचले. ते दहा हजार रुपये! दहा हजार रुपये पुष्कळ असले तरी त्यांतले एकदां थोडेथोडे भास्कररावांना देण्यास सुरुवात केली म्हणजे ते संपायला कितीसा उशीर? आणि पैसे परत करण्याची थापबाजी आतां तिला पुरती कळून आली होती. अडचणींत सांपडलेला मित्र वगैरे सगळ्या थापाच होत्या. पैसे कोठें जातात, आपल्या सोन्यासारख्या संसाराचा कोटल्या महालक्ष्मीनें विध्वंस मांडला आहे, हें तिनें आपल्या चाणाक्षपणानें केव्हांच ओळखलें होतें. पण हें नुसतें समजून काय उपयोग? भास्करराव सरकारी तिजोरींतून वेळोवेळीं रक्कम उचलीत खरीच. अशावेळीं नाइलाजानें पतीची कायमची बेअब्रू व स्वतःच्या संसाराचा सत्यानाश टाळण्यासाठीं कोणत्या ना कोणत्या उपायानें ती रक्कम उभी करी.

या प्रसंगीं रक्कम उभी करणें सोपें होतें खरेंच. या वेळीं मानापमानाच्या कल्पना बाजूला सारून तिला बापापाशीं याचना करावयाची जरूर नव्हती. पण त्या दहा हजाराला हात लावण्याचा विचार तिला असह्य यातना देत होता. बापानें आपल्या नांवावर दहा हजार रुपये ठेवलेले ऐकल्यापासून तिनें कितीतरी मनोरम सौख्यचित्रें आपल्या चक्षूंपुढें रेखाटलीं होतीं! स्वतःसाठीं सुखाची किंवा ऐश्वर्याची ती लालसा करीत नव्हती. आपल्या नशिबीं काय आहे हें तिला पूर्णपणें कळून चुकलें होतें. तिचें रूप, तिचें

शहाणपण, तिचे सद्गुण भास्कररावांच्या संसारांत मातीमोल झाले होते. पण आपल्या लाडक्या मधूसाठीं ते दहा हजार रुपये ती राखून ठेवणार होती. बाबासाहेबांनीं ५॥ टक्के व्याजाचे दहा हजार रुपयांचे बाँड लक्ष्मीच्या नांवानें केले होते. सध्यां तर मधू लहानच होता. पण तो पांच वर्षांचा झाल्यानंतर त्याच्या सर्व शिक्षणाची सोय त्या दहा हजार रुपयांच्या व्याजांतून व प्रसंगीं मुद्दलांतून ती करणार होती. भास्कररावांच्या राज्यांत मधूचें शिक्षण कितपत होणार तें दिसतच होतें.

थोडेसें कामापुरतें शिकून एखाद्या खर्डेघाश्याची नोकरी त्याच्या नशिबीं यावयाची ! पण बाबासाहेबांचे दहा हजार रुपये म्हणजे लक्ष्मीच्या हातीं स्वर्गच आल्यासारखें तिला वाटलें. त्या दहा हजार रुपायांच्या जोरावर सुशिक्षण संपादून यशोवंत झालेल्या तिच्या लाडक्या मधुकराचें भावी चित्र पाहून तिचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून येत. त्या भावी अमोल सौख्यागाराला काय आपल्या हातानें आज काडी लावावयाची !

या अशा विचारांनीं लक्ष्मीचें चित्त रात्रभर व्यग्र झालें होतें. यामुळें भास्कररावांना अपेक्षित असें उत्तर निश्चितपणें तिच्याकडून मिळालें नाहीं.

दुसरा दिवस उजाडला. नेहमींप्रमाणें भास्करराव दहा वाजतां जेवले; पण नेहमींप्रमाणें लगबगीनें कचेरींत न जातां आपल्या खोलींत पलंगावर ते स्वस्थ पडून राहिले. बिचाऱ्या भावड्या पार्वतीकाकूंचें धाबें दणाणून गेलें. जेवण अर्धेंच टाकून त्या उठल्या व आपल्या लाडक्या पुत्रापाशीं जाऊन त्याच्या प्रकृतीबद्दल मायेनें चौकशी करूं लागल्या; पण भास्करराव नुसतें तिरसटल्यासारखें करीत होते; त्या माउलीला धड सरळ उत्तरसुद्धां त्यांच्यानें देववलें नाहीं. शेवटीं बराच वेळ झाल्यावर आईचा आपल्याला कदाचित् झाला तर उपयोगच होईल अशा विचारानें कीं काय भास्करराव चटकन् उठून बसले. आईकडे केविलवाणें त्यांनीं एकदां पाहिलें व आपले डोळे पुसल्यासारखें करून खोल गेलेल्या आवाजानें ते म्हणाले,

" आई, मला कांहीं होत नाहीं; पण कचेरींत जायला मात्र मला आज तोंड नाहीं. म्हणून पडलों आहे स्वस्थ झालं. "

" म्हणजे रे काय बाबा ? " मुलाची प्रकृति ठीक आहे हें ऐकून प्रथम आनंदलेल्या व मग त्याचें पुढचें चमत्कारिक उत्तर ऐकून अतोनात घाबरलेल्या पार्वतीकाकू ओरडल्या.

भास्कररावांनीं एक दीर्घ सुस्कारा सोडला व आपली नेहमींची बनावट कादंबरी हळूहळू आईला सांगण्यास सुरुवात केली. आपल्या जिवलग मित्राला—भारीच अडचणींत होता तो—बरीच मोठी रक्कम सरकारी तिजोरींतून आपण कशी दिली, ती त्याच दिवशीं कशी भरायला पाहिजे होती, न भरल्यास आपल्यावर तोहमत येऊन आपल्याला खडी फोडायला कसें जावें लागेल, वगैरे गोष्टींचें भडक चित्र त्यांनीं चितारलें. तें सगळें ऐकून पार्वतीकाकूंच्या अंतःकरणाचें पाणी पाणी झालें. पण एकंदरींत एवढ्यावर मजल जाणार नाहीं, जाऊं द्यावयाची नाहीं, असें त्यांनीं मनाशीं ठरविलें.

" हात्तिच्या, पैशाचीच तेवढी बाबत ना ? मग काय रे त्याच्यांत एवढं हें मानून घेतो आहेस ? रक्कम काय भरतां येईल कुठूनही. "

" आई, उगीच नाहीं घाबरलों मी. रक्कम लहानसहान नाहीं आहे ! "

" बोल तरी एकदां किती आहे ती. " किंचित् उत्सुकतेनें, किंचित् बैतागानें पार्वतीकाकू म्हणाल्या.

" पांच हजार " मोठ्या कष्टानें भास्कररावांच्या तोंडून शब्द निघाले व कांहींशा शरमेनें व बऱ्याचशा आविर्भावानें त्यांनीं मान खालीं घातली.

तो मोठा आंकडा ऐकून पार्वतीकाकूंची छाती हादरून गेली. मध्यम स्थितींतल्या सासरीं माहेरीं वाढलेली ती बाई ! एवढी मोठी रक्कम म्हणजे असेल तरी कितीशी याची तिला नीट कल्पनासुद्धां करतां आली नसती. हो, नाहीं म्हणायला कालच दुसरा एक असा मोठा आंकडा तिनें ऐकला होता खरा. आपल्या सुनेला मिळालेले दहा हजार रुपये म्हणजे तिला गजान्त लक्ष्मीचीच दौलत वाटली. म्हणूनच तिचें मन त्या वेळीं आनंदानें

व अंबाबाईच्या भक्तिपूर्ण कृतज्ञतेनें गहिंवरून आलें होतें. मुलाची, कां कोण जाणे—संसारांत नेहमीं ओढघस्त होते हें त्या रोज पहातच होत्या. ती ओढ आतां या दहा हजारांनीं कमी होईल या आशेनेंच त्यांचें अंतःकरण भरून आलें होतें.

पण दुसऱ्या दिवशीं ही नवीनच अडचण उपस्थित झाली. रक्कम फार खरीच. त्यांचें मुलाविषयींचें स्नेहपूर्ण हृदय जरासें चाळलें. एवढ्या मोठ्या रकमेची उलाढाल या मूर्खानें केली कशाला? पण आपल्या मुलाचा—एवढ्या मोठ्या गृहस्थाचा दीन रणकुंडीस आलेला चेहरा पाहून त्यांचें हृदय पुन्हां द्रवलें. मोठा झाला तरी व्यवहारांत अजून तो पोरच नाहीं तर काय? भोळ्या भावानें, उदार अंतःकरणानें मित्राला मदत करायला गेला आणि केवढ्या पेंचांत सांपडला; पण याला आतां उपाय काय करणार? ते दहा हजार चटकन् त्यांना पुन्हां आठवले.

“अरे, भलताच घोंटाळा करून बसलास खरा; पण एवढं नको कांहीं त्याचं मनाला लावून घ्यायला. ते बाबासाहेबांनीं दिलेले रुपये आहेत ना, त्यांतले भर सध्यां. मग तुझा मित्र पैसे परत करील तेव्हां पुन्हां दहा हजार करून ठेव म्हणजे झालं.”

पण दिसते तेवढी गोष्ट सोपी असती तर भास्कररावांना एवढी बतावणी करण्याचें कारणच पडलें नसतें.

“नाहीं, आई” ते मान हलवून म्हणाले “तें नाहीं जमायचें. तिचे पैसे तिच्या बापानें तिला दिलेले आहेत. त्याला काय म्हणून मीं हात लावायचा?”

“अरे, पण पैसे घेऊन टाक असं कां म्हणतें आहे तुला मी? नुसते जरा हातउसने घेतल्यासारखे करायचे. तूं विचार पाहूं लक्ष्मीला? बघ बरं. ती चटकन् घ्या म्हणून म्हणेल कीं नाहीं? तूं आपला एक मोठा साधूच आहेस अगदीं. नसत्या शंका-कुशंका काढीत बसतोस.”

आईच्या त्या कौतुकोद्गारांनीं भास्कररावांना जरा हंसूंच आलें. पण चटकन् तें दाबून टाकून ते म्हणाले—

" सगळे उपाय करून पाहिल्याशिवाय कां असा मी स्वस्थ बसून राहीन आई ? "

" म्हणजे काय, विचारलेंस तिला पैशाबद्दल ? मग काय 'नाहीं' म्हणाली ? अरे, ही काय बायको आहे कां...पण छे ! लक्ष्मी कधीं नाहीं असं करायची. तूंच तिची नीट समजूत पाडून दिली नसशील. थांब हो, मीच विचारतें तिला " असें म्हणून स्वर उंचावून पार्वतीकाकूंनीं हांक मारिली.

" लक्ष्मी, जेवण झालं असलं तुझं तर जरा बाहेर येऊन जा बघूं. "

जरा वेळानें लक्ष्मी बाहेर आली. तिचा चेहरा त्रस्त व डोळे लाल दिसत होते. तिच्याकडे एकवार पाहून पार्वतीकाकू भास्कररावांकडे वळल्या व म्हणाल्या—

" हं ही बघ आली. विचार पाहूं माझ्यादेखत नीट एकदां. "

भास्करराव क्षणभर स्तब्ध राहिले. लक्ष्मी बावरल्यासारखी होऊन भिंतीशीं टेकून उभी राहिली. तिच्या अंतःकरणांत चाललेल्या भावनांचा खळखळाट तिच्या चेहऱ्यावर स्पष्टपणें प्रतिबिंबित झाला होता.

" लक्ष्मी " भास्करराव गंभीर आवाजानें म्हणाले. " मी काल सगळी हकीकत सांगितलीच आहे तुला. प्रसंग आणीबाणीचा आहे. " बोलतां बोलतां भास्कररावांचा स्वर कंपित झाला व कंठ रुद्ध होऊन गेला. पार्वतीकाकूंच्या डोळ्यांतून भराभर टिपें गळूं लागलीं. लक्ष्मी पतीच्या चेहऱ्याकडे नजर लावून संत्रस्त मुद्रेनें दगडासारखी निश्चल उभी होती.

" लक्ष्मी " भास्करराव पुढें बोलूं लागले. " आज तूं माझ्यावर एवढी दया केली नाहींस तर मी कायमचाच जगांतून उठेन. सांग लक्ष्मी, एकदां शेवटचें सांग. तुझ्या पैशांतून पांच हजार रुपये मला तूं देशील का ? "

तो करुण प्रसंग पार्वतीकाकूंना असह्य झाला. " अरे, ती नाहीं कां म्हणते आहे ? असा काय तूं एवढा पुरुष माणूस काकुळतीस आल्यासारखा करतो

आहेस ? " त्या म्हणाल्या. लक्ष्मीनें आपल्या सासूच्या करुण व विकृत चेहऱ्याकडे नजर वळवली आणि एकदम तिचा संताप अनिवार झाला. इतक्या दिवसांच्या भास्कररावांच्या लाजिरवाण्या रडकथा त्या दोघांनींही पार्वतीकाकूंच्या कानावर जाऊं दिल्या नव्हत्या. पण या वेळेस आपण पैसे देण्यास तयार नाहीं, असें पाहून त्या माउलीला मध्यस्थी घालण्याचा व अशा प्रकारे तिच्या हृदयाला यातना देऊन आपल्याला निर्दय ठरविण्याचा आपल्या पतीचा निर्लज्ज डाव पाहून ती क्रोधानें लाल झाली. शक्य तितका आपला राग आवरून धरून ती किंचित् कंपित स्वरांत म्हणाली,

" नाहीं, मी माझ्या पैशांतले पांच हजार रुपये आपल्याला देण्यास तयार नाहीं. "

भास्कररावांनीं निराशेनें, दुःखानें पुन्हां मान खालीं घातली पण पार्वती-काकू संतापानें नागिणीसारख्या उसळल्या.

" लक्ष्मी, तूंच कां बोलते आहेस ही ! नवऱ्यापेक्षां तुला पैसे जास्त झाले हं ? आणि शिवाय तो तुझे पैसे कांहीं खाऊन नाहीं टाकणार. त्याला सवड झाली म्हणजे तुझे तुला देऊन टाकील तो. "

सासूच्या कठोर वाग्बाणांनीं लक्ष्मीचें हृदय घायाळ झालें; परंतु तिच्या स्थितीला कारण झालेल्या आपल्या पतीकडे तिरस्कारानें पाहून ती म्हणाली,

" ती आशाच नको. "

भास्कररावांनीं पुन्हां एकदां मान वर उचलली व धैर्य धरून म्हटलें,

" लक्ष्मी, तुझ्या गळ्याची, आईच्या पायाची, आपल्या मधुबाळाची शपथ वहातों कीं मी पुन्हां असें करणार नाहीं. "

" असें " म्हणजे काय व तें न करण्याबद्दल इतकी शपथ वहाण्याचें काय कारण हें न समजून पार्वतीकाकू वेड्यासारख्या दोघांकडे आळीपाळीनें पाहूं लागल्या. पण लक्ष्मी " असें " म्हणजे काय हें केव्हांच समजली होती. तिनें शांतपणें तुच्छतेच्या आवाजांत उत्तर दिलें—

" असल्या शपथा वहाण्याची ही पहिलीच वेळ नाहीं कांहीं. "

भास्करराव निरुत्तर झाले. आणखी कांहीं बोलण्याला त्यांना तोंड नव्हतें. पण पार्वतीकाकू मात्र लक्ष्मीची ती तिरस्कारपूर्ण बेपर्वाईनें उत्तरे देण्याची तऱ्हा पाहून संतापानें अगदीं बेफाम झाल्या.

" चांडाळणी " त्या कर्कश आवाजांत ओरडल्या "नवरा तुरुंगांत गेल्यावर ते दहा हजार रुपये घेऊन कुणाच्या उरावर घालणार आहेस ? "

लक्ष्मी झंझावातांत कापणाऱ्या नाजूक लतेप्रमाणें थरथर कांपली. तिचीं ती दीन अवस्था पाहून पार्वतीकाकू किंचित् नरमल्या.

" हें बघ लक्ष्मी, तुला शहाणी शिकलेली म्हणून इतके दिवस वाखाणली त्याचें हेंच कां तूं चीज करणार ? अग, प्रत्यक्ष आपल्या नवऱ्याच्या अब्रूवर, आपल्या कुळाच्या नांवलौकिकावर येऊन गुदरलं तरीसुद्धां तूं आपला पैसाच कां उराशीं धरून बसणार आहेस ? "

लक्ष्मीच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा सुरूं झाल्या.

" कसं आपल्याला सारं समजावून सांगूं मी ! मी पैसा माझ्यासाठीं बाळगून ठेवीत नाहीं हो—पण माझ्या मधूची काय वाट ? "

" हें काय वेडयासारखं तूं बोलते· आहेस लक्ष्मी " पार्वतीकाकू मायेनें म्हणाल्या " एवढा त्याचा धुरंधर बाप इथं उभा असतांना मधूची काय वाट असं अभद्रवाणी काय बोलतेस ! एवढी एकदां अडचण निघून जाऊं दे मग आपल्या मधुबाळाला ग काय कमी पडणार आहे ? "

लक्ष्मी जास्तच कष्टी झाली. खिन्न स्वरानें ती म्हणाली—

" आपल्याला तें सगळं मला स्पष्ट करून सांगतां येणार नाहीं. आणि आपल्याला तें सारं न कळलेलंच बरं. एवढं मात्र मी आपल्याला खात्रीपूर्वक सांगतें कीं मधूबाळाचा योग्य प्रतिपाळ आणि त्याचं शिक्षण इकडून होण्याची आशाच नको."

हे शब्द पार्वतीकाकूंना अत्यंत कडु लागले. पण लक्ष्मी इतक्या निश्चयी स्वरांत बोलली होती कीं तिचा प्रतिकार कसा करावा हेंहि त्यांना समजेना. त्या क्षणभर स्तब्ध बसल्या. भास्कररावहि हा सगळा संवाद ऐकत

स्तब्ध बसले होते. आपल्या आईची मध्यस्थी निष्फळ झालेली पाहून त्यांची पूर्ण निराशा झाली; आईकडे पाहून ते म्हणाले—

" आई, नको आतां आणखी कांहीं बोलूं. कशाला उगीच जीवाचा एवढा संताप करून घेतेस? मी माझ्या दुर्दैवाचे फेरे सोसण्यास तयार आहे. आणखी दहाबारा तासच काय तो तुमचा आमचा ऋणानुबंध आहे. साहेबांनीं कचेरींत येऊन हिशोब पाहून शिल्लक तपासली कीं आमच्या नांवानं धरणं सुटलंच म्हणून समज. ये आई जरा अशी, हा थोडासा वेळ तरी आनंदांत घालवूं. "

हा भास्कररावांचा मानभावीपणा व सासूची दीन अवस्था पाहून किंचित् दबलेला लक्ष्मीचा क्रोध पुन्हां दुप्पट जोरानें जागृत झाला. त्यांच्याकडे वळून तीव्र स्वरानें ती म्हणाली,

" नाहीं, राजरोसपणें तुरुंगांत जाऊन माझ्या मधूच्या नांवाला कायमचा कलंक लावून ठेवण्याचें पाप मी तुमच्या हातून घडूं देणार नाहीं. त्याच्या प्रत्यक्ष कल्याणाकरितां तुमच्या हातून कांहीं होणें नाहीं तें नाहींच, पण त्याचें सारें आयुष्य मातीमोल करण्याचें मात्र श्रेय कां पदरांत घेतां ? "

" लक्ष्मी, तें मला सगळं समजतं, " लक्ष्मी या भीतीनें तरी आपल्याला पैसे देण्याचें कबूल करील या अंधुक आशेनें किंचित् आनंदून भास्करराव म्हणाले. ' मधू तुरुंगांत गेलेल्या बापाचा मुलगा अशी नामुष्की होऊं नये म्हणून तुझ्यापाशीं लाजबीज बाजूला ठेऊन मी पैशाची याचना करीत होतों."

" या मानभावीपणाच्या गोष्टी मला कळतात. पण मी अशी फसणारी नव्हे. तुम्हाला माझ्या मधूसाठीं मीं बाळगून ठेवलेले पैसेहि देणार नाहीं आणि तुम्हांला राजरोसपणें तुरुंगांतहि जाऊं देणार नाहीं. "

आश्चर्यानें गोंधळून जाऊन भास्करराव तिच्याकडे पाहूं लागले.

" आधीं उठा, " लक्ष्मी पुढें बोलूं लागली. " ही स्वस्थ बसण्याची वेळ नव्हे. आपले कपडे आणि काय तें जरुरीचें सामानसुमान गोळा करा आणि कुठं तरी लांबलांब निघून जा. सात आठ दिवस तुमच्या पाठीमागचं धरणं

कसं तरी मी थांबवून धरीन. नांव गांव छपवून कुठें तरी कालक्रमणा करा पण पुन्हां—''

भिन्नभिन्न मिश्रित भावनांनीं लक्ष्मीचा कंठ भरून आला. तिला तें अप्रिय वाक्य पुरें करवलें नाहीं.

हे अगदीं अनपेक्षित व अत्यंत अमानुष भासणारे शब्द ऐकून मायलेक दोघेंही अगदीं थक्क झालीं. पार्वतीकाकू तर संतापानें इतक्या बेहोष झाल्या कीं त्यांच्या तोंडून शब्दच उमटेना. भास्कररावांनीं कांहीं बोलण्याचा प्रयत्न केला पण लक्ष्मीची ती अत्यंत उदास, खिन्न पण दृढनिश्चयाच्या तेजानें तेजस्वी दिसणारी मुद्रा पाहून एकही शब्द उच्चारण्याचें धाडस त्यांना झालें नाहीं. पार्वतीकाकूंनीं भास्कररावांकडे पाहिलें. त्यांना निःशब्द झालेले पाहून त्यांच्या वाचाशक्तीवरील दडपण एकदम दूर झालें. पण आणखी क्रोधोद्गार काढण्याचें सामर्थ्य त्यांच्या प्रबल संतापानें खिळखिळया झालेल्या जीर्ण शरीरांत उरलें नव्हतें. या मनोदौर्बल्यामुळें त्यांच्या क्रोधाचें पर्य-वसान आक्रोशांत झालें. कपाळावर ताडकन् हात मारून घेऊन त्या रडूं लागल्या.

" लक्ष्मी, लक्ष्मी, तूं इतकी निर्दय कशी ग झालीस ? लक्ष्मी, तूं शहाणी ना ? " असें कांहीं तरी असंबद्ध वेड्यासारखें त्या बडबडूं लागल्या.

" लक्ष्मी " एकदम कांहीं तरी आठवल्यासारखें करून म्हातारी आवेशानें बोलूं लागली. " अग, तूंच ना मला रोज महाभारतांतल्या गोष्टी वाचून दाखवतेस ? पतिव्रतेचं आख्यान परवांच नव्हतं कां ग आलं ? पति-व्रतेच्या प्रभावानं— "

" पतिव्रता " हा शब्द पार्वतीकाकूंच्या तोंडून निघाल्याबरोबर लक्ष्मी हृदयाला इंगळी डसल्याप्रमाणें एकदम चरकली.

" मी पतिव्रता धर्म विसरलें, असं कां आपलं म्हणणं ? "

" दुसरं काय आतां म्हणूं मी लक्ष्मी ? " पार्वतीकाकू डोळे पुसून लक्ष्मी-कडे टक लावून म्हणाल्या.

लक्ष्मीचें हृदय अग्नीवर पसरल्याप्रमाणें तडफडूं लागलें. आपण पतिव्रताधर्म सोडून वागतों आहों काय? पतिव्रताधर्माचें पालन हें प्रत्येक हिंदु बालिकेचें, युवतीचें आणि प्रौढेचें ध्येय असतें. पतिव्रताधर्म पालन करण्यासाठीं अनंत हिंदु स्त्रियांनीं आजपर्यंत आपल्या प्राणाचीसुद्धां होळी केली आहे. तें पवित्र पातिव्रत्त्याचें ध्येय आज आपण लाथाडतों आहों काय? लक्ष्मी किंकर्तव्यमूढ होऊन उभी राहिली. क्षणभरानें स्वस्थचित्त होऊन तिनें आपल्या हृदयाचा कोंपरा न् कोंपरा धुंडाळून पाहिला; पण आपण कोठल्याहि पवित्र कार्यापासून ढळलों आहों असें तिचें मन तिला सांगेना. या आत्मसंशोधनानें तिचें मन पूर्ण शांत झालें. तिनें आपले विचार एकत्र केले व दृढ स्वरानें ती म्हणाली.

" नाहीं, पतिव्रताधर्म मी विसरलें नाहीं बरं. उलट तो मी अत्यंत कसोशीनें, जगांत आणि घरांत मानहानि सोसून, नांवाला कायमचा कलंक लावून घेण्यास तयार होऊन पाळीत आहे. "

पार्वतीकाकूंनीं भेदक दृष्टीनें लक्ष्मीकडे पाहिलें. जणूं काय ऐन संकटाच्या वेळीं प्रत्यक्ष नवऱ्याला मदत न करणारी, त्याला घरांतून 'चालते व्हा' म्हणून सांगणारी बाई कोणत्या अर्थानें पतिव्रता होऊं शकणार असें हेटाळणीनें त्या तिला विचारीत होत्या. लक्ष्मी पुढें बोलूं लागली.

" पतिव्रता कुणाला आपण म्हणाल? मला असं वाटतं कीं पतीचं व्रत, त्याचं कर्तव्यकर्म पाळण्यास त्याला जी मनोभावानें मदत करते तीच खरी पतिव्रता. स्वतःचा पति जर आपल्या कर्तव्यकर्मापासून चुकूं लागला तर पतिव्रता पत्नीनें त्याचा तोल संभाळून त्याला परत सन्मार्गावर आणलं पाहिजे. पण—" अत्यंत कठोर स्वरानें लक्ष्मी म्हणाली, " जर वारंवार प्रयत्न करूनहि पति सन्मार्गावर येत नसेल, कुलाचा नांवलौकिक वाढवण्याऐवजीं तो धुळीला मिळवीत असेल, कुटुंबांतील लहानमोठ्या माणसांचा प्रतिपाळ करण्याचें सोडून त्यांचेंहि कायमचें अकल्याण होण्याचें साधन करून ठेवीत असेल, तर पतिव्रता पत्नीनें त्याला मन कठोर करून संसारांतून

दूर करावें व आपल्या शिरावर आपल्या पतीचें कर्तव्य पूर्ण करण्याची जबाबदारी घ्यावी. आज मी तेंच करीत आहे. ही जबाबदारी अत्यंत कठीण असूनहि ती आपल्या शिरावर घेण्यास मी तयार झालें आहे. मी आपले म्हातारपणचे दिवस सुखानें जातील असं करीन आणि आपल्या मधूला कुलदीपक बनवीन. हें सगळें मी एकटी स्वतंत्रपणें करण्यास समर्थ आहे म्हणून म्हणतें" भास्कररावांकडे वळून लक्ष्मी म्हणाली "तुम्ही आतां दूरदेशीं जाण्याची तयारी करा. भाड्याला लागतील तेवढे पैसे मी देईन."

लक्ष्मीची मुद्रा तिच्या निश्चयाच्या व कर्तव्यपालनानें मिळणाऱ्या मानसिक समाधानाच्या तेजानें तेजस्वी दिसत होती. त्या तेजामुळें भास्कररावांची मान आपोआप लवली व मुकाट्यानें ते उठून आसपासचे आपले कपडे एका लहानशा ट्रंकेंत भरूं लागले.

# फसवणूक

१

" किती उशीर केलास ग हा ! "

सुधा पद्मेचा हात धरून तिला बागेकडे नेत म्हणाली.

" बहुतेक सारी मंडळी येऊन मुख्य मुख्य जागा भरल्या सुद्धां "

" खरंच " पद्मा सभोंवार पसरलेल्या मनमोहक टेबलांच्या पसाऱ्याकडे व रंगीबेरंगी कपड्यांच्या जमावाकडे पहात उद्गारली. " फारच उशीर झाला खरा. प्रुफं तपाशीत बसलें होतें—मग एकदां वाटलं होतं कीं येऊंच नये "

" वा, वा. ग. बरीच आहेस कीं ? म्हणे वाटलं येऊंच नये. आमचे सन्माननीय पाहुणे एवढे प्रसिद्ध कवि, त्यांच्याशीं तुझ्यासारख्या प्रसिद्ध लेखिकेचा परिचय व्हावा, म्हणून यांची स्वतःची सुद्धां फार इच्छा आहे. चल, चल, तिकडे कविराजांच्या टेबलापाशीं त्या पहा आणखी खुर्च्या मांडवल्या आहेत मीं ! "

" नको, नको, गडे, " सुधाला अडवीत पद्मा म्हणाली. " तुझी फार,

फार आभारी आहे हं मी. पण गडे, सकाळपासून डोळेफोड करून भारीच त्रासून अन् शिणून गेली आहे मी. चार माणसांत जाऊन हास्यविनोद करावा असा उत्साहच नाहीं वाटत मला. आपली जरा स्वस्थ बसून गंमत पहायला मिळेल नि मन रिझेल म्हणून आलें मी "

" असं म्हणतेस ! " सुधा निराशेच्या स्वरानें म्हणाली. पद्मेच्या श्रांत व मलूल चेहऱ्याकडे पाहून तिनें आग्रह करण्याचें सोडून दिलें.

" बरं मग; कुठं बसतेस ? "

" या इकडे कडेला. इथें बघ किती टेबलं रिकामीं आहेत. "

त्या रिकाम्या टेबलांकडे जातां जातां वाटेंत पद्मा एकदम थबकली. जवळच्याच टेबलापाशीं एक तरुण मोठ्या उत्सुक भावानें तिच्याकडे पहात बसला होता. चटकन् मनांत भरण्याजोगा त्याचा नीटस व तरतरीत चेहरा व त्याच्या मुद्रेवरील आतुरभाव यांनीं पद्मेचें चित्त वेधून घेतलें.

" येथेंच बसतें मी. ओळख दे यांच्याशीं करून " ती म्हणाली.

" वा, उत्तमच योगायोग. हे आमच्या धाकट्या भावोजींचे परममित्र शरश्चंद्र गोखले, एम्. ए. चा अभ्यास करताहेत हे. त्यांच्या कॉलेजांतल्या सारस्वत संघाचे हे सेक्रेटरी आहेत. यांनींच तुझ्या कादंबऱ्यांवरचा तो डिबेट अरेंज् केला होता. "

" आलें, आलें, लक्ष्यांत " पद्मा उत्सुकतेनें म्हणाली. शरश्चंद्रानें आपल्या भाषणांत तिच्या कादंबऱ्यांची केलेली गोड स्तुति तिच्या चांगली ध्यानांत होती. तरुणपिढीसाठींच लिहिलेल्या तिच्या त्या रसपूर्ण कादंबऱ्या; तेव्हां तरुणमंडळींचा स्तुतिकरभार तिला आवडावा व लक्षांत राहावा हें साहजिकच होतें.

" या, पद्माबाई "—सुधा पद्मेची ओळख करून देऊं लागली.

" हो, हो, ऐकून व पाहून ठाऊक आहे मला " शरश्चंद्र विनीत भावानें म्हणाला. " प्रत्यक्ष भेटीचा लाभ मात्र नव्हता झाला अद्याप. "

इतक्यांत आणखी कांहीं पाहुणे मंडळी आल्यामुळें व त्या दोघांचा परि-

चयविधि पार पडला असल्यामुळें सुधा, " जरा जाऊन येतें हं " म्हणत लगबगीनें दुसरीकडे गेली.

पद्मा खुर्चीवर बसली व कांहींशी शरश्चंद्राकडे पहाण्यांत व कांहींशी सभोंवताली पहाण्यात गुंग होऊन गेली. शरश्चंद्र मात्र तिच्या अस्तित्वाशिवाय दुसरें कांहीं जसें कांहीं जाणतच नव्हता. तिच्यासाठीं चहा ओतण्यांत, फळें कापण्यांत व तिची बशी खाद्यपेयांनीं भरण्यांत तो अगदीं मनापासून गढून गेला होता. पद्माचेंही लक्ष हळुहळू सभोंवतालच्या कोलाहलांतून निघून, त्याच्या हालचालीकडे आकृष्ट होऊं लागलें.

" पुरे पुरे कीं मला ! " आपल्या बशीकडे पहात पद्मा म्हणाली. " आणि वा; माझ्यावरच हा सारा भडिमार आणि आपल्या बशींत कांहींच नाहीं तें. "

अत्यंत मोहकपणानें पद्मा हंसत होती.

शरश्चंद्र लाजल्यासारखा झाला व " नाहीं, नाहीं, मी पण घेतोंच आहे ना हें " असें म्हणत त्यानें एक पदार्थ उचलून आपल्या बशींत ठेवला. त्या पदार्थाशीं विमनस्कपणें चाळा करणारीं त्याचीं गौरवर्ण लांबसडक बोटें व त्याचीं आरक्त निमुळतीं नखें पद्मा लुब्ध दृष्टीनें पहात होती.

एकदम तिच्या मनांत एक विचार चमकून गेला. शरश्चंद्रही आपल्याकडे तसाच लुब्ध नजरेनें पहात असेल कां ?

पण छे; शरश्चंद्र चोरून सुद्धां तिच्याकडे पहाण्याचा प्रयत्न करीत नव्हता. पद्मेनें निराशेचा एक सुस्कारा सोडला. आपल्या वेषभूषेवर तिनें एकदां मनोमय शोधक नजर फिरविली. कपाळावर रुळत असलेल्या बटेपासून तों काळ्या पंपशूजमधून डोकावत असलेल्या शुभ्र नाजूक पाउलापर्यंत सारी सजावट तिनें आपल्या स्वरूपसुंदर नायिकांप्रमाणें बनवली होती. किंबहुना, जास्त सत्यास धरून सांगावयाचें म्हणजे स्वतःच्या सौंदर्यावरून, चालण्याबोलण्यावरून, पोशाख पेहरावावरून तिनें आपल्या नायिका रेखाटल्या होत्या. तिचे रसिक नायक तिच्या नायिकांचें बेभानपणें आपादमस्तक

निरीक्षण करीत तासचे तास बसत. पण तिच्या स्वतःच्या मनानें पसंत केलेला हा तरुण मात्र तिच्याकडे ढुंकूनसुद्धां न पहातां, विमनस्कपणें कसला तरी जणूं काय गूढ विचार करीत बसला होता.

हें असें कां ? त्याच्या चेहऱ्यावरचा आरंभींचा तो आतुर भाव काय झाला ? तोच तो भाव पाहून औत्सुक्यानें तिनें त्याच्या शेजारीं बसण्याची इच्छा दर्शविली होती. तेव्हां तिला वाटलें होतें, आपल्या उत्कृष्टांतील उत्कृष्ट अशा कादंबरीचा आरंभसुद्धां इतक्या मनमोहक पण इतक्या सहज रीतीनें झाला नसेल.

तीं दोघें अशीं स्तब्ध किती तरी वेळ बसलीं होतीं. बाकीच्या टेबला-भोंवतीं हासपरिहास, नर्मविनोद, इत्यादिकांचा गलबला उडाला होता.

कुशल यजमानीण आपल्या पाहुण्यांना मुबलक खाद्यपेयें मिळताहेत किंवा नाहीं हें दक्षपणें पाहातेच; पण त्याबरोबर पाहुण्यांच्या मनाला उत्साह-वर्धक व आनंददायक असें हास्यविनोदाच्या संभाषणाचें खाद्य मिळतें आहे किंवा नाहीं, याकडेही तिचें बारीक लक्ष असतें. शरश्चंद्र व पद्मा एकमेकां-समोर मूकपणें कितीतरी वेळ बसलेलीं पाहून सुधा अस्वस्थ झाली. नवीन आलेल्या एका पाहुणीला त्यांच्या टेबलावर पाठवावें म्हणजे तरी संभा-षणाचा चिमलेला ओघ सुरू होईल, अशा आशेनें, तिला घेऊन सुधा पद्मेच्या टेबलाकडे वळली.

तें पहातांच पद्मा व शरश्चंद्र एकदम भानावर आलीं व त्यांनीं आपली मनःस्थिति सावरण्यास सुरुवात केली. त्या दोघांनाही निरनिराळ्या कारणां-साठीं एकांत अपेक्षित होता. पद्मेनें चटकन् आपली छत्री व छोटीशी पर्स शेजारच्या तिसऱ्या खुर्चीवर ठेऊन दिली. शरश्चंद्रानें उरलेली चौथी खुर्ची अगदीं आपल्याजवळ ओढून घेऊन तिच्याशींच खेळण्यास आरंभ केला; व दोघेंहि एकदम कांहींतरी संभाषण सुरू करून त्यांत अगदीं गढून गेल्यासारखीं दिसलीं.

चतुर सुधा समजली, व तिनें आपल्या नव्या पाहुणीची दुसरीकडे व्यवस्था केली.

पूर्वयोजना कांहीं एक न करतां, एकदम सुरू केलेल्या संभाषणाला विषय पद्माच्या कादंबरीखेरीज दुसरा कोठला सांपडणार ? शरश्चंद्रानें तावडतोब तिच्या कादंबऱ्यांची मुक्तकंठानें प्रशंसा करण्यास सुरुवात केली. अर्थात्, ती प्रशंसा कादंबऱ्यांच्या सर्वांगीण सौंदर्यापेक्षां, त्यांच्या सर्वांगसुंदर नायिकांचीच होती.

ती ऐकतां ऐकतां पद्मेच्या तोंडावर मधुरस्मित विलसूं लागलें. आपल्या कादंबऱ्यांचे दुसरे सुंदर गुण न उल्लेखिल्याबद्दल दुसऱ्या एखाद्या अरसिक टीकाकारावर ती रागावली असती. पण तिच्या सुंदर नायिकांचें सहृदयपणें वर्णन करणारा हा तरुण टीकाकार, कां कोण जाणें, तिला फार प्रिय भासूं लागला.

ती मनाशीं म्हणत होती.

" माझ्या काल्पनिक, निर्जीव नायिका यांना इतक्या आवडतात, मग ज्या सजीव सौंदर्यावरून त्या रेखाटल्या गेल्या— "

तिच्या विचाराची साखळी एकदम तुटली.

शरश्चंद्र तिच्याकडे पुन्हां आरंभींच्या आतुर भावानें पहात होता, आणि म्हणत होता,

" मी एक प्रश्न तुम्हांला विचारूं का ? रागावणार तर नाहीं ना ? "

त्याचा तो स्निग्ध, मृदु स्वर व त्याच्या मुद्रेवरील औत्सुक्यपूर्ण अधीर भाव पाहून पद्मा गडबडली, गोंधळली. तिचें तोंड आरक्त झालें व दृष्टि टेबलाकडे वळली. चहाचा पेला, आपल्या भावना लपविण्यासाठीं, उगाचच तोंडाशीं नेत, आपला आवाज अगदीं निर्विकार राखण्याचा प्रयत्न करीत ती म्हणाली,

" वा, राग कसला त्यांत ! काय विचारायचं आहे, विचारा ना. "

आतां शरश्चंद्राची लाजायची, गोंधळायची पाळी होती. हातांत हात

अडकवून पंजांचीं बोटें मागेंपुढें सरकवीत तो संकुचित स्वरानें हलुहळू बोलूं लागला.

"आपल्या नायिका सत्यसृष्टींतल्या आहेत का ? दुसरें असें—मीं आपल्या कादंबऱ्यांचा फार सूक्ष्म अभ्यास केला आहे. माझें असें अनुमान आहे कीं, निरनिराळ्या परिस्थितींत वावरणाऱ्या, निरनिराळ्या मोहक रूपानें भुलवणाऱ्या तुमच्या नायिका एकाच व्यक्तीचीं भिन्नभिन्न स्वरूपें आहेत—

"खरं आहे तुमचं अनुमान" पद्मेच्या तोंडांतून एकदम उद्गार निघून गेला.

शरश्चंद्राला आतां जास्त धीर आला. उत्सुकतेनें पद्माकडे पहात तो म्हणाला,

"आपण सांगूं शकाल मला, कोणत्या व्यक्तीवरून आपल्या नायिका रेखाटल्या आहेत आपण ? ती व्यक्ति सत्यसृष्टींतली आहे ना, का काल्पनिक आहे."

पद्मा गोंधळली. शरश्चंद्राकडून अशा प्रश्नाची तिनें अपेक्षा केली नव्हती. तिच्यासमोर बसून, सहवासांत तासभर राहून, शेवटीं तिनें कोणत्या व्यक्ती-वरून आपल्या नायिका रेखाटल्या याच्याबद्दल शरश्चंद्रानें अशा गाढ अज्ञानाच्या आतुरतेनें प्रश्न विचारावा !

पण अद्यापि ती निराश झाली नव्हती. शरश्चंद्राच्या मनाचा पूर्णपणें थांग लावण्यासाठीं ती सूचक असे प्रश्न त्याला विचारूं लागली.

"शरश्चंद्र, ती एक सत्यसृष्टींतली व्यक्ति आहे असं क्षणभर धरून चाललं तरी अशा व्यक्तीही एकाहून जास्त कशावरून नसूं शकतील ? जग अफाट आहे. वसुंधरेत नाना रत्नें आहेत. मला स्फूर्ति देणाऱ्या त्या व्यक्तीप्रमाणेंच हुबेहूब अशा दुसऱ्या व्यक्ती आपल्याही पहाण्यांत असतील.—मग मला असा प्रश्न विचारण्यापासून काय निष्पन्न होणार बरे ?"

"नाहीं, नाहीं," शरश्चंद्र आवेशानें म्हणाला, "आपण म्हणतां तशी

अपूर्व व्यक्ति माझ्या अवलोकनांत अजून आली नाहीं;—हसूं नका. माझ्या वयावरून माझ्या अनुभवाचा अंदाज करूं नका. अनेक हेतूंनीं, नानाप्रकारच्या समाजांत, अनेक स्त्रियांच्या मेळ्यांत मिसळण्याचे प्रसंग मला आले आहेत. पण आपल्या कादंबऱ्या वाचतांना, ज्या मधुर सहवासाची गोडी चाखायला मिळते, तशा सहवासाचा आस्वाद मला एकदां सुद्धां लाभला नाहीं. "

पद्मेच्या हृदयांत कालवाकालव होऊं लागली. करुण स्वरानें ती म्हणाली,

" शरश्चंद्र, नीट स्मरण करा. जुन्यानव्या साऱ्या आठवणींवरून एकदा शोधक नजर टाका. ज्या मधुर सान्निध्याचें तुम्ही वर्णन करतां, तसें सान्निध्य तुम्हांला थोडा वेळ सुद्धां, एखादा क्षण सुद्धां, कधीं कधीं लाभलें नाहीं ! "

तिच्या कंपित स्वराचें आणि विकल मुद्रेचें शरश्चंद्राला आश्चर्य वाटलें. पण तिच्या विनंतीप्रमाणें, थोडा वेळ जसें काय नीट स्मरण करून, तो पुन्हां उद्गारला,

" नाहीं बुवा ! खात्रीनें नाहीं. म्हणून तर माझ्या मनाला, तुम्हांला भेटून एकदां हा प्रश्न विचारण्याची तीव्र तळमळ लागली होती. तुमच्या कादंबऱ्या वाचून, माझ्याप्रमाणेंच साऱ्या तरुण मनांची कुचंबणा होत असली पाहिजे. तुमचीं शब्दचित्रें इतकीं जीवंत चैतन्यानें रसरसलेलीं असतात कीं त्यांना सत्यसृष्टींत कांहीं तरी आधार असला पाहिजे, अशी खात्री वाटते. पण सत्यसृष्टींत तर मला अजून तो आधार सांपडला नाहीं. म्हणून विचारतों— "

शरश्चंद्र थबकला. पद्मेचे डोळे पाण्यांनीं भरून आले आहेत, असा त्याला भास झाला. एक दीर्घ सुस्कारा सोडून पद्मा म्हणाली,

" माफ करा, शरश्चंद्र, तुमची अशी कुचंबणा झाल्याबद्दल मला फार वाईट वाटतं. सत्यसृष्टींत तुम्हांला अशी व्यक्ति सांपडणार नाहीं. "

तिच्या या रोखठोक उत्तरानें शरश्चंद्र निराशेनें थिजून गेला. पण दुसऱ्याच क्षणीं तक्रारीच्या, उत्तेजित स्वरानें तो म्हणाला,

" तर मग सत्याचा आभास उत्पन्न करून साऱ्या तरुण पिढीची अशी फसवणूक कां करतां आपण ?— "

अत्यंत करुण व म्हणूनच विलक्षण भासणारें हास्य करून उदास स्वरानें पद्मा म्हणाली,

" शरश्चंद्र, केवळ तुमचीच नाहीं; माझी स्वतःचीही भयंकर फसवणूक आज कित्येक वर्षें, अज्ञानानें, करीत आलें आहे मी ! "

शरश्चंद्र गोंधळांत पडला. पण पद्मेच्या निराशापूर्ण, दुःखी मुद्रेकडे पाहून, आणखी कांहीं विचारण्याचें धाडस त्याला करवेना.

# " अनाथांचा वाली " १०

" तुझ्याकरतां दुःख करणारीं तीन माणसें जर तुला आठवलीं तर मी तुला पुन्हां जिवंत करीन " देवदूत राजाला म्हणाला.

माझी व छोटया सुधाची गोष्ट अगदीं रंगांत आली होती; तोंच शेजारचा वसंत हळूंच दार लोटून मंद पावलांनीं माझ्यापाशीं येऊन बसला. तो गोष्ट ऐकण्याकरितांच आला असावा अशा समजुतीनें मी गोष्टीचा पूर्वसंदर्भ सांगणार, तोंच त्याच्या खिन्न व कांहींशा भयभीत चेहऱ्याकडे व हातांच्या बोटांशीं चाललेल्या संत्रस्त चाळ्यांकडे माझें लक्ष गेलें.

" काय झालं रे वसंत ? " मीं विचारलें.

" आमच्या वाड्यांतली ती पार्वती मेली, माई. " रडव्या स्वरानें वसंत म्हणाला. भीतीनें व आणखी कशानें कोण जाणे त्याचे डोळे भरून आले होते.

माझ्या काळजांत चर्रर झालें. पार्वतीबद्दल मला फार, फार अनुकंपा वाटे. बिचारी असहाय बालविधवा, हृदयाची श्रीमंती पूर्णपणें पारखी असलेल्या

सासरच्या दहा माणसांच्या खसाल्यांत, आयुष्याचा एक एक दिवस कंठीत होती. दिवसेंदिवस अन्नाच्या, जोपासनेच्या, मायेच्या अभावीं तिचें शरीर झिजत चाललेलें दिसतच होतें आम्हांला. त्यांत दहाबारा दिवसांपूर्वी तिला विषमाचा ताप आलेला ऐकला होता.

" केव्हांशी गेली ती ? " मीं खिन्न, उदासवाण्या स्वरांत विचारलें.

" ही आत्तांच "

मला पुन्हा एकदां धक्का बसला. ही आत्तांच !—आणि तिच्या घरांत पूर्णपणें शांतता नांदत होती ! हीच जर नवऱ्याची बायको, भावाची बहीण, आईची मुलगी असती तर—तर आक्रोशानें सारी आळी दणाणून गेली नसती का ?

वेडी, खुळी समजूत. पण माणूस गेलें, अन् आक्रोश सुरू झाला तरच बरें वाटतें मनाला. मनुष्याचें आत्मप्रेम किंवा स्वत्वाची बढाइकी हें त्याचें कारण असेल कदाचित्. जो माणूस गेला, त्याची उणीव तीव्र भासते म्हणून इतर माणसें रडतात.—आपलीही अशीच जरूर आहे सर्वांना—असें माणसाला सूक्ष्म रीतीनें वाटत असेल कदाचित्. मरत्या माणसालासुद्धां आपल्या भोंवतीं रडलेल्या आप्तमाणसांचा गराडा पडला, म्हणजे याच कारणामुळें समाधान वाटत असेल; किंबहुना आपण देवापाशीं मुलेंमाणसें मागतों, याचें कारण ही सुप्त स्वार्थबुद्धिही असेल !

तें कांहीं कां असेना, पण आज पार्वतीसाठीं एकही अश्रुबिंदु गाळला गेला नाहीं, हें पाहून माझें अंतःकरण तळमळूं लागलें. दुःखी कष्टी जीवांच्या उसाश्यांच्या सोबतीशिवाय, अश्रूंच्या तर्पणाशिवाय पार्वतीच्या मृतात्म्याला मोक्षाचें समाधान लाधणार नाहीं, अशा दृढ समजुतीनें माझा जीव हळहळूं लागला.

पांच मिनिटें या अशा विचारांच्या तंद्रींत मी नकळत अगदीं स्तब्ध बसलें होतें.

आणि एकाएकीं एक हृदयभेदक टाहो आकाश दुभंगीत गेला.

" देवा, कां रे त्या माउलीला अशी एकाएकीं ओढून नेलीस ? "

आश्चर्यानें, आनंदानें मी क्षणभर स्तिमित झालें. दुसऱ्याच क्षणीं धांवतच दार उघडून मी रस्त्यावर आलें.

पार्वतीच्या दारांत एक दीनवाणी धोबीण आक्रोश करीत उभी होती.

ताबडतोब सर्व प्रकार माझ्या लक्षांत आला.

विषमाच्या रोग्याचे, सांसर्गिक विषाचे कपडे घरांत कसे धुवायचे ! चालत्या धंद्याचा धोबी तरी तसले घाणेरडे कपडे कशाला पत्करतो ! तेव्हां पार्वतीच्या नातेवाईकांनीं एक कानाकोंपऱ्यांतली, धंदा बसलेली दरिद्री धोबीण या कामासाठीं शोधून काढली होती.

चारपांच दिवसांपूर्वी यासंबंधींचें कांहीं बोलणें निसटतें माझ्या कानावर पडलें होतें.

कपड्यांचा ढीग मोठ्या हौसेनें आपल्या गाठोड्यांत बांधतां बांधतां ती विचारीत होती.

" किती दिवसांचं काम आहे ? "

" पुष्कळ, महिनाभराचं. बेचाळीस दिवसांचा ताप आहे. "

बिचाऱ्या धोबिणीचें तोंड हंसरें झालें. तिच्या कच्च्याबच्च्यांना आतां महिनाभर तरी चारापाण्याची ददात पडणार नव्हती !

आणि आज—एकाएकीं पार्वतीचें जास्ती होऊन ती दगावली. त्या गरजू जीवावर हें आकाशच कोसळलें नाहीं का ?

हुंदके देऊन देऊन ती रडत होती. तिच्या रक्ताचेच थेंब जसे कांहीं तिच्या डोळ्यांतून गळत होते.

मला क्षणभर भास झाला कीं परलोकाच्या दाराशीं खिन्नपणें थबकून आशेनें मागें वळून पहात असलेला अनाथ पार्वतीचा आत्मा या दुसऱ्या अनाथ जीवाच्या अश्रुपातानें तृप्त झाला असेल ! दंवबिंदूंनीं फूल डवरतें, उमलतें, तशी अनाथ पार्वती या सहानुभूतीच्या ओलाव्यानें नवजीवन पावून आपल्या मार्गाला लागली असेल !

अनाथांचा वाली या जगांत दुसरा कोण आहे !

# पूर्वजांची पुण्याई ११

*" अथातो ब्रह्मजिज्ञासा— "*

गंभीर स्वरानें परमहंस निरूपण करीत होते. जवळ जवळ पंचवीस संन्यासी व वानप्रस्थाश्रमी लक्ष देऊन ऐकत होते व मधून मधून माना डोलवीत होते. मी एका कोंपऱ्यांत बसून ऐकत होतों–ऐकत होतों कसला—माझ्या कानांवर शब्द पडत होते,—एवढेंच. लक्ष कुठें होतें कोण जाणे ! सहजच माझी नजर त्या साऱ्या समुदायावरून फिरली व मला नकळत हसूं आलें.

ते सारे वृद्ध,—कांहीं लांब दाढी वाढवून भगवी छाटी पांघरलेले, तर कांहीं दाढींचे खरखरीत खुंट बाळगून उपरणें पांघरलेले—जगाकडे पाठ फिरवलेले ते सारे मुमुक्षु—त्या समुदायांत मी असलेला पाहून माझें मलाच हसूं आलें. मला अजून तिशी उलटली नव्हती. सुखोपभोगांचा कंटाळा येण्याला, ते अजून माझे उपभोगूनच झाले नव्हते. जग मीं अजून पुरतें पाहिलेंच नव्हतें. मग त्याला कंटाळून मुमुक्षु बनणें बाजूलाच राहिलें !

त्या हास्याची रेषा माझ्या तोंडावर उमटून मावळते न मावळते, तोंच मी एकदम आश्चर्यानें चपापलों. माझ्याच वयाचा, पण माझ्यापेक्षां जास्त सुखासीन आयुष्याचा रुबाब अंगावर दिसणारा एक आकर्षक तरुण हळूंच आश्रमांत प्रवेशला; परमहंसांच्या पायाची धूळ मस्तकीं लावून, त्यानें इकडे तिकडे बघितलें व तो माझ्याजवळ येऊन बसला. जमिनीवर दृष्टि लावून, परमहंसांचें प्रवचन तो एकाग्रतेनें ऐकूं लागला. माझें सारें लक्ष त्याच्याकडे लागून राहिलें होतें; पण त्याला मात्र परमहंसांच्या शब्दसृष्टीशिवाय भोंवतालच्या इतर सृष्टीची जाणीव होतीसें दिसत नव्हतें.

निरूपण संपलें; श्रोतृवर्ग पांगला; त्या तरुणानें पुन्हां परमहंसांना वंदन केलें व तो बाहेर पडला. माझी कुतूहलबुद्धि मला स्वस्थ बसूं देईना. तो आश्रमाच्या बाहेर पडण्यापूर्वींच मीं त्याला गांठलें, व सहज कांहीं तरी बोलणें सुरू करण्याकरितां म्हणून म्हटलें,

"आपण आज प्रथमच येथें प्रवचनाला आलां नाहीं ? कसं काय वाटलं आपल्याला परमहंसांचं निरूपण ?"

त्यानें कांहींसें उत्तर दिलें; त्याचें उत्तर संपतें न संपतें तोंच मीं कुतूहलानें विचारलें,

"या संन्याशांच्या समुदायांत, या तपोभूमीच्या आवारांत आपली उपस्थिति जराशी आश्चर्य वाटण्याजोगीच गोष्ट आहे, नाहीं ?"

बोलतां बोलतां माझी नजर त्याच्या टापटिपीच्या, उंची पोशाखावरून, त्याच्या तोंडावरील ऐश्वर्याच्या तेजावरून सहजच फिरली. त्याच्याही तें लक्षांत आलें; तो क्षणभर स्तब्ध राहिला. नंतर एकदम माझ्याकडे पाहून, किंचित् हंसून तो म्हणाला,

"हाच प्रश्न मला आपल्यालाही करतां येण्याजोगा आहे, नाहीं का ?"

मी चपापलों; माझें तरुण वय, असंन्यस्त वृत्ति, निरूपणांतील अनवधान —माझ्या मलाच प्रतीत झालेल्या या गोष्टी, शून्यहृदयी दिसणाऱ्या या तरुणाच्या लक्षांत आल्या होत्या तर !

मी चटकन् उत्तरलों.

" माझ्या येथल्या उपस्थितीचं कारण आहे एक. मी येथें आश्रमांतच रहातों. बाहेरच्या जगाशीं माझा संपर्क नाहीं. मी अज्ञात ठेवूं इच्छित असलेल्या एका घटनेमुळें जगानें मला कांहीं दिवस विसरावें, अशी इच्छा आहे माझी."

तो पुन्हां हंसला व खिन्न झाला. जरा वेळानें, खोल आवाजांत तो म्हणाला, " मलाहि तसंच कारण आहे एक. जगाला विसरायची मला फार इच्छा आहे." मी बुचकळयांत पडून त्याला आणखी खुलासा विचारणार तोंच त्याच्या डोळ्यांकडे माझी नजर गेली. त्याच्या विशाल, काळ्याभोर डोळ्यांवर कारुण्याची आर्त छटा तरंगत होती. माझें हृदय द्रवलें. त्याचा हात आपल्या हातांत घ्यावा, त्याच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवून त्याचें सांत्वन करावें, असें माझ्या मनांत येतें न येतें तोंच त्याच्या डोळ्यांतली करुण छटा मावळून, त्यांच्यांत एक प्रकारचें चमत्कारिकच पाणी चमकलें. तो कसेंसेंच भीषण हंसला व एकदम उत्तेजित स्वरानें म्हणाला,

" माझ्या मित्रा, उद्यां माझा तिसावा वाढदिवस आहे. तूं ये ना माझ्या घरीं. आपण गप्पागोष्टी करूं; मजा करूं जरा."

खिशांतून आपलें कार्ड काढून त्यानें माझ्या हातांत दिलें व तो एकदम निघून गेला.

आज एक वर्ष मी या मठांत, अज्ञातवासांत होतों. अगदीं तशीच गरज असल्याशिवाय, मी कधींच मठाबाहेर पडलों नव्हतों. पण दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं निरूपण संपल्यावर माझ्या मनाला कांहीं चमत्कारिकच ओढ लागली. माझा तो नवा मित्र आज निरूपणाला आला नव्हता. त्याचें तें विचित्र स्वरांत दिलेलें आमंत्रण मला पुनः पुन्हां आठवत होतें. माझ्या इच्छेविरुद्ध माझ्या पायांनींच जसें कांहीं मला आश्रमाबाहेर काढलें. खिशांतील कार्डावरचा पत्ता शोधीत मी निघालों. माझ्या या कृतीचें माझें मलाच आश्चर्य वाटत होतें. पण माझ्या मित्राच्या डोळ्यांत चमकलेलें तें चमत्कारिक

पाणी—एखादें कोडें सोडविण्याचा जसा एखादे वेळेस मन हट्ट धरतें, तसें झालें होतें मला.

मी, तशाच मनाच्या बधिर स्थितींत, यंत्राप्रमाणें त्याच्या घराच्या पायऱ्या चढून गेलों व घंटा वाजवली. दार उघडण्यास आलेला नोकर माझा वेष व मुद्रा पाहून जरा चपापला. मालकाच्या बोलावण्यावरून मी आलेला आहे हें ऐकून तो गोंधळल्यासारखा दिसला. पण खानदानीच्या घराण्यांत वावरणाऱ्या नोकराला साजेशा अदबीनें त्यानें मला दिवाणखान्यांत बसवलें व तो आंत गेला.

मी दिवाणखान्यांत बसून इकडे तिकडे बघूं लागलों. त्या दिवाणखान्याची संपन्न व अद्यावत् सजावट पाहून मी कांहीं अचंबलों नाहीं. माझ्या मित्राच्या रुबाबदार चालण्याबोलण्यावरून, त्याच्या वेषमुद्रेवरून, त्याच्या रहाणीचा अंदाज मीं केलाच होता. पण माझें लक्ष विशेष कशानें वेधून घेतलें असेल तर तें भिंतीवरील मोठमोठ्या तैलचित्रांनीं. माझ्या मित्राचें घराणें पुष्कळच जुनें व खानदानीचें असावें. त्याचे पांचसहा पूर्वज चित्रांत विराजमान झाले होते. मी उठलों व सहज कांहीं चाळा म्हणून प्रत्येक तसबिरीजवळ जाऊन, तिचें बारीक निरीक्षण करूं लागलों; तरुण, देखणे, ऐटबाज, रुबाबदार—असे सारे दिसत होते ते. पण त्यांचे डोळे—मी चपापलों एकदम पहातां पहातां! त्यापैकीं प्रत्येकाच्या डोळ्यांत एकाच तऱ्हेचें पाणी लकाकत होतें—माझ्या मित्राच्या डोळ्यांत मला काल दिसलें होतें ना—तशाच तऱ्हेचें.

माझ्या निरीक्षणांत व चिंतनांत मी इतका गढून गेलों होतों कीं, माझ्याजवळ कोणी येऊन उभें राहिलेलें मला कांहीं वेळ समजलेंच नाहीं.

पण कांहीं वेळानें मला, कशी कोण जाणे—त्या सुंदर स्त्रीच्या सान्निध्याची जाणीव झाली. अंथरुणावर डोळा लागतां लागतां, उशीखालच्या सुगंधी फुलांची जशी जाणीव होते,—तशीच.

हो, फारच सुंदर होती ती स्त्री. पण केवळ तिच्या सौंदर्यानेंच मला मुग्ध केलें होतें असें नाहीं.

तिनें मला या बसा केलें. आपल्या पतीच्या व माझ्या नव्या मैत्रीबद्दल ती कांहींसें बोलत होती; पण ती काय म्हणत होती, याचा मला बोधच होत नव्हता.

या दैवी सौंदर्याचा, या सात्विक, स्निग्ध सोज्वळतेचा स्वामी होता माझा भाग्यशाली मित्र! आणि तरी तो म्हणाला होता—

" जगाला विसरायची इच्छा आहे, माझी. "

माझ्या मनाला पडलेलें कोडें त्याला जास्तजास्तच वेडावून टाकीत होतें. माझी नजर सहजच पुन्हां त्या भिंतीवरील तैलचित्रांकडे वळली.

त्या तरुणीच्या हें लक्षांत आलें, व एकदम, उत्कट स्वरानें ती म्हणाली,

" हो, त्या तसबिरींबद्दलच मी सांगणार होतें तुम्हाला. तुमच्या मनांत त्या बऱ्याच भरलेल्या दिसतात. केव्हांतरी मी बोलेन त्यांच्याबद्दल तुमच्या-जवळ. पण आतां ते आले म्हणजे मात्र त्यांच्याजवळ—आतां येतीलच ते."

माझ्या दृष्टींतील प्रश्न ओळखून ती म्हणाली.

" त्यांना आज जरा बरं नाहीं. कुणाला भेटूं दिलं नाहीं त्यांना आज. पण तुमची भेट घेण्याचा हट्टच घेतला त्यांनीं. ते आले म्हणजे— "

" त्यांचा आज खरंच कां तिसावा वाढदिवस आहे ? " मी विचारलें.

" हो. " ती घाईघाईनें बोलूं लागली. " तें पण सांगायचं होतं मला, तुम्हाला. म्हणून ते कपडे बदलीत असतांना, मी धावत पुढं आलें. ते आले म्हणजे—एरवीं तुम्ही त्यांच्याशीं पुष्कळ बोला. त्यांना बरं वाटेल तुमच्याशीं बोलण्यांत. तुमच्याबद्दल कालपासून ते मला सांगताहेत सारखे.—मात्र—"

इतक्यांत दारावरचा पडदा बाजूला करून माझा मित्र आंत आला. त्या तरुणीच्या चेहेऱ्यावर चिंतेची छटा उमटली. माझ्याकडे तिनें आतुरतेनें डोळे लावले; जणूं काय मी आतां जें कांहीं बोलेनचालेन त्यावर त्या दंपतीचें सारें सुखदुःख अवलंबून होतें.

माझा मित्र माझे दोन्ही हात धरून स्वागत करीत होता. त्यानें मला

कोंचावर आपल्या शेजारीं बसवून घेतलें. मला एक सिगरेट देऊन ती माझ्यासाठीं शिलगावली व आपण दुसरी घेऊन ओढूं लागला.

तो सारखा बोलत होता. तो कशाबद्दल, काय बोलत होता, याकडे चित्तच लागेना माझें. त्याच्या डोळ्यांत तें काल चमकलेलें चमत्कारिक पाणी, त्याच्या पूर्वजांच्या त्या तसबिरी, त्याची ती देवतातुल्य पत्नी, तिचें माझ्याशीं झालेलें व अर्धवट राहून गेलेलें बोलणें, व त्या बोलण्याला पूरक होण्यासाठीं धडपडत असलेली तिची ती आर्त, उत्कट नजर—या साऱ्या गोष्टींनीं माझें चित्त बहिरून गेलें होतें.

" बस्स, मित्रा, " माझा मित्र माझ्या पाठीवर हात मारीत म्हणत होता. " आपली मैत्री आपण वाढविली पाहिजे. समानशील असा तूं एकच माणूस मला आज कैक वर्षांनीं लाभलास. जगाला तूं नको आहेस ना ? मलाही जग नको आहे.—चल, आपण दोघं कुठंतरी— "

त्याच्या त्या बोलण्यानें मी जास्त जास्तच गोंधळून गेलों. त्याच्या पत्नीच्या जास्त जास्तच सचिंत, घाबरट, कावऱ्याबावऱ्या होत जाणाऱ्या मुद्रेकडे माझें लक्ष होतेंच. जास्तकमी विचार न करतां मी एकदम म्हणालों,

" छी, छी, महाराज, आपण काय बोलतां हें. कुठं आपण आणि कुठं मी. " त्याच्या सभोंवार पसरलेल्या ऐषआरामाकडे हात करीत मी म्हणालों, " जगांतील सारीं मुखं आपल्यापुढं हात जोडून उभीं आहेत. " माझा हात त्याच्या पत्नीच्या दिशेला स्थिरावलेला माझ्या प्रथम लक्षांत आला नाहीं; पण त्याच्या आला. त्याचे डोळे कावरेबावरे झाले. पण मी पुढें बोलतच होतों.

" मी एक क्षुल्लक भणंग भिकारी. मला ना गांव ना नांव. माझ्यासारख्या क्षुद्र कीटकांची आपल्यासारख्या— " त्या भिंतीवरच्या तसबिरीकडे माझी नजर वळली. " उच्चकुलीन, खानदानीच्या माणसाशीं बरोबरी— "

त्या तरुणाचे डोळे फारच चमत्कारिक झाले. तो ताडकन् उभा राहून त्या तसबिरींकडे हात करून आवेशानें म्हणाला,—" उच्चकुलीन, खानदानीचे— "

ती तरुणी घाबरली व एकदम उठून चार पावलें आपल्या पतीजवळ गेली. तिनें माझ्याकडे पाहिलें. मी गोंधळलों. तिच्या दृष्टींत खिन्नतेची, नाराजीची स्पष्ट छटा मला दिसली. मी गोंधळलों. आपण भलतेंच कांहींतरी, जें बोलायला नको होतें,—जें मी बोलूं नये अशी त्या तरुणीची इच्छा व विनंति होती—तें बोलून गेलों, असें मला वाटलें. काय करावें तें मला सुचेना. शेवटीं मी नम्रपणें म्हणालों, " महाराज, आपली प्रकृति बरी दिसत नाहीं. माझ्याशीं बोलण्यानें आपल्याला त्रास होत आहे.

त्या तरुणीच्या चेहेऱ्याकडे लक्ष जातांच मला बरें वाटलें. मोठ्या संकटांतून सुटल्याप्रमाणें तिनें एक निःश्वास टाकला. मी मोठ्या उमेदीनें पुढें बोलूं लागलों,—

" आपण काल बोलावल्याप्रमाणं आपल्याला भेटायला व बधाई द्यायला आलों होतों मी. आपला आज तिसावा वाढदिवस आहे असं आपण म्हणालां होतां. देव करो आणि असे अनेक— "

पण या माझ्या शब्दांबरोबर त्या दोघांच्या चेहेऱ्यांत जो बदल झाला त्यानें मी दचकलोंच. त्या तरुणाचा चेहेरा—त्याला मी काल पाहिलेला नसता तर त्याला मी एक शुद्ध वेडाच समजलों असतों !

" तिसावा वाढदिवस—तिसावा. " तो भ्रमांत बरळल्यासारखें बडबडला. भिंतीवरच्या तसबिरींकडे आपली घट्ट वळवलेली मूठ करून तो क्रुद्ध आवाजांत ओरडला, " खानदानी घराणें—खानदानी " दांतओंठ खात चारपांच ग्राम्य शब्द त्यानें उच्चारले व त्या तसबिरींवर धावून जाण्याचा आविर्भाव तो करूं लागला. आणि ती तरुणी—तिच्या मुद्रेचें मी कसें वर्णन करूं ! तो सौम्य, स्निग्ध, सोज्वळ, देवतासमान चेहरा माझ्या शब्दांनीं इतका विकृत होऊन गेला होता—त्या पापाबद्दल विधात्यानें मला जन्मोजन्मीं नरकांत खितपत पडण्याची जरी शिक्षा दिली असती, तरी ती मला वाटतें माझ्या पापाच्या मानानें अपुरीच पडली असती.

ती आपल्या पतीच्या अगदीं जवळ येऊन उभी राहिली होती; त्याचे

दोन्ही खांद धरून, त्याला आपल्या हृदयाशीं घेत, कोमल हळुवार शब्दांनीं ती त्याला शांत करीत होती.

" नका गडे, नका असा त्रास करून घेऊं. माझ्यासाठीं तरी—शांत व्हा ना. चला, आपण थोडी विश्रांति घ्या. हे आपले मित्र थांबतील आपली विश्रांति घेऊन होईपर्यंत— "

असें आणखी कितीतरी तऱ्हेनें आर्जव करून तिनें आपल्या पतीचा मनस्ताप ज़रासा सौम्य केला व त्याला घेऊन ती घरांत गेली.

माझ्या मनाची मेल्याहून मेल्यासारखी स्थिति झाली होती ! जमीन फाटून आंत मी गडप होईन तर बरें असें सारखें मला वाटत होतें. पण तीं उभयतां तेथून निघून गेल्यावर, तेथून बाहेर पडण्यासही माझें मन घेईना. माझे पाय जसे कांहीं एखाद्या अज्ञात आकर्षणानें जागच्या जागीं खिळून राहिले होते. एक तर त्या अश्राप माऊलीची झाल्या अपराधाबद्दल क्षमा मागितल्याशिवाय मी तेथून जाणें माझ्या मनाला योग्य वाटत नसावें, शिवाय या साऱ्या कोड्याचा कांहीं तरी उलगडा व्हावा, अशी इच्छा व उत्कंठा माझ्या मनाला लागून राहिली होतीच !

माझ्या अपेक्षे व इच्छेप्रमाणें ती तरुणी थोड्या वेळानें दिवाणखान्यांत परत आली .अतिशय श्रमानें माणूस दमून जावें त्याप्रमाणें तिच्या चेहेऱ्यावर ग्लानि दिसत होती. मलूलपणें, असहाय्यतेनें, तिनें आपलें अंग एका खुर्चीवर टाकून दिलें.

तिच्या त्या क्लान्त मूर्तीला पाहून पश्चात्तापानें पोळलेलें माझें हृदय जास्तच तडफडूं लागलें. मी पुढें होऊन खिन्न स्वरानें म्हणालों,

" माई, तुमची क्षमा मी कोणत्या शब्दांनीं मागूं ? ह्या दुर्भागी प्राण्याचा ज्याच्या ज्याच्याशीं संबंध येईल, त्याला त्याला दुःखाचीच प्राप्ति व्हावी असा परमेश्वराचा मला शापच आहे कीं काय, कोण जाणे ! "

माझ्या शब्दांत व्यक्त झालेली माझ्या हृदयांतील तळमळ तिला जाणवली. त्या साध्वीचें नवनीतकोमल हृदय माझ्या दुःखानें विरघळलें असावें.

आपल्या दुःखमूर्च्छेतून एकदम जागृत झाल्यासारखी ती चटकन् उठून बसली, व माझ्याकडे स्निग्ध दृष्टीनें पहात म्हणाली,

" छे, छे, भलतंच एखादं. आमच्या दुर्दैवानंच आमच्या नशीबीं दुःख लिहिलं आहे; तें आम्ही भोगीत आहोंत; त्यांत तुमच्याकडे काय बरं बोल ? तुम्ही अगदीं कांहीं मनाला लावून घेऊं नका. या बसा असे इथं— "

तिच्या प्रेमळ शब्दांनीं माझें हृदय कांहींसें शांत झालें. एका ठेंगण्याशा वर्तुलाकार आसनावर मी बसलों व तिच्याकडे पूज्यबुद्धीनें नजर लावली.

ती कांहीं वेळ स्तब्ध होती. माझी नजर तिच्याकडून भिंतीवर टांगलेल्या त्या मोठमोठ्या तसबिरींकडे मला नकळत वळली.

माझी नजर तिकडे गेलेली पाहून ती एकदम म्हणाली,

" त्याबद्दलच सांगणार होतें मी तुम्हाला; पण राहूनच गेलं. पाहिल्यात या तसबिरी नीट ? कसे एकेकजण राजबिंडे आहेत नाहीं ! पण या राजबिंड्या घराण्याला एक भयंकर शाप आहे. " तिनें एक दीर्घ उसासा टाकला.

माझ्या उत्कंठेची तार ताणून तुटण्याच्या बेतांत आली.

" वयाचीं तीस वर्षे या सर्वांचीं आनंदांत, मौजेंत गेलीं. पण नंतर, एखाद्या झाडावर अकस्मात वीज पडून तें जसं उभंच्या उभं जळावं, तशी ऐन उमेदींत यांची अवस्था होई. एक प्रकारची वेडाची लकेर त्यांच्या वागण्यांत मारूं लागे; व वर्षाच्या आंत ते पार वेडे होऊन आपल्या मुलांमाणसांच्या दुःखाचं केवळ कारण होऊन रहात. "

आतां माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला ! माझ्या मित्राला आज तीस वर्षे पुरीं होत होतीं ! !

माझ्या मनांतला विचार समजूनच जशी काय ती म्हणाली, " आज त्यांना तीस वर्षें पुरीं झालीं. आज आठ दिवस त्यांची मनःस्थिति भयंकर झाली आहे. "

इतका वेळ उसनें आणलेलें तिचें धैर्य पुन्हां गळालें व तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले.

" कालपासून त्यांनीं हट्ट धरला आहे कीं, मी आमच्या शामला घेऊन माहेरीं जावें; पण मी कशी बरं जाऊं यांना सोडून ? "

ती जास्तच स्फुंदूं लागली.

मला तिच्या दुःखाबद्दल कळवळा दाखवावा, का तिच्या अपूर्व त्यागी ममतेबद्दल तिची वाखाणणी करावी, हेंच समजेना.

ती पुढें बोलूं लागली.

" मला भीति वाटते कीं, ते एखादे वेळेस माझा डोळा चुकवून नाहींसे होतील. आतांशा ते नेहमीं म्हणतात ' मी जर नाहींसा झालों तर तुमच्या सुखांतला कांटा दूर होईल. "

दुःखावेगामुळें तिला कांहीं वेळ बोलवेना. थोड्या वेळानें डोळे पुसून किंचित् शांत होऊन, ती मला म्हणाली,

" म्हणून आज मी तुमची सारखी वाट पहात होतें. तुमचं ते ऐकतील. त्यांच्या अशा नाहींसं होण्यानं, आम्हांला सुख होणं तर राहिलं बाजूलाच, पण केवढे दुःखाचे डोंगर आमच्यावर कोसळतील हें तुम्ही सांगाल त्यांना नीट समजूत पाडून ! ते गेले, तर मी क्षणभर तरी जिवंत राहूं शकेन कां हो ? "

पुन्हा तिला जोराचा हुंदका आला व तिनें पदरानें आपलें तोंड झांकून घेतलें.

मी तिच्या त्या दैवी भावनांच्या साध्या पण अद्भुत आविष्कारापुढें निःशब्द व स्तिमित होऊन बसलों होतों.

मला भास झाला, माझ्या मित्राचे ते सारे पूर्वज भिंतीवरून, पुढें वांकून, तिच्या दीन पण आदरणीय मूर्तीकडे आशेनें, कौतुकानें, टक लावून पहात होते. माझ्या मनांत विचार आला, पूर्वजांच्या पापांचीं फळें माझ्या मित्राला भोगावीं लागलीं खरीं;—पण अशा प्रेमळ, निरागस, निःस्वार्थी जीवाची जन्माची जोड त्याला लाभावी, म्हणून त्याच्या पूर्वजांची किती तरी पुण्याई खर्ची पडली असेल बरें !

## अपघात १२

काहीं तरी गोड गोड संवेदना झाली व भय्यासाहेबांनीं डोळे उघडले, भोवतालीं भिरी भिरी त्यांनीं पाहिलें; कांहीं उमज पडेना त्यांना.

कुठें आहोंत आपण? भोवतालची मंडळी कोण? मोठ्या कष्टानें त्यांनीं उशागतीं नजर फिरविली.

हं. ही आपली लाडकी माया.

आपल्याकडे भय्यासाहेबांची नजर वळलेली पाहून मायेनें आपला हात पुन्हां त्यांच्या कपाळावरून फिरवला.

हाच तो गोड स्पर्श.

या जाणीवेनें भय्यासाहेबांच्या ओठांवर स्मित फुटूं पहात होतें; पण कुठें-तरी ताणल्यासारखें, फाटल्यासारखें झालें. डोळ्यांपुढें अंधारी आल्यासारखी वाटली.

भय्यासाहेबांनीं डोळे पुन्हां मिटून घेतले.

पण यावेळीं कांहीं ते मद्यांसारखे बेशुद्धींत नव्हते; त्यांच्या डोक्यांत विचारचक्र फिरत होतें.

हं आठवलें...

आपण अन् उमा सायकलरिक्शांत बसून घरीं चाललों होतों.

उमाच्या अगदीं जवळ, तिला बिलगून बसावें लागलें होतें, पण आपल्या डोक्यांत विचार घोळत होते मायेचे.

मायेनें परीक्षा उत्तीर्ण झाल्याच्या खुशालींत आपल्या आवडत्या प्रोफेसरांना थाटाची मेजवानी दिली होती. घरच्या ' निर्जीव ' खाण्याला कंटाळलेल्या भय्यासाहेबांसाठीं स्वतः खपून मायेनें आज नानाप्रकारचे " सजीव " पदार्थ बनवले होते. पण–पण ते पदार्थ जास्त रुचकर का मायेचें बोलणें चालणें, मधुर हावभाव, नेटकी वेषभूषा जास्त हृद्य, हें कांहीं भय्यासाहेबांना सांगतां आलें नव्हतें—आणि मग जेवणें झाल्यावर माया दिलरुबा घेऊन बसली तेव्हां तर तिच्या लडिवाळ रूपावरून, ललित विभ्रमावरून जीव ओवाळून टाकावासा वाटला होता भय्यासाहेबांना. " अकरा वाजले; उदयची आतां उठण्याची वेळ झाली; " असें उमानें तीनचार वेळां भय्यासाहेबांना सुचवलें, तेव्हां अत्यंत नाखुशीनें भय्यासाहेबांनीं मायेचा निरोप घेतला होता.

पण रिक्शांत बसून घरीं जातांना भय्यासाहेबांच्या मनांत मायेचेंच चिंतन चाललें होतें.

ते मनांत म्हणत होते,

" मायेची परीक्षा झाली; आतां एकदां काय तो सोक्षमोक्ष केला पाहिजे—

" काय जड वाटतंय् आपणांला एवढं यांत ? पत्नीला, अपत्यांना दूर सारून, पत्नीपेक्षां सहस्रपटीनें मोहक अशा शिष्येशीं विवाह करणारे कांहीं पहिलेच प्रोफेसर नाहीं आपण. "

पण त्यांचा स्वतःचा आणि मायेचाही कटाक्ष होता कीं, असल्या नाजुक कामांत भलतीच घिसाडघाई नाहीं करायची.

आठच दिवस झाले. मायेनें त्यांना ती वाचीत असलेली एक इंग्लिश कादंबरी वाचायला पाठविली होती. तींत पत्नीला सोडून प्रियकरणीबरोबर पळून गेलेला प्रणयी, वर्षभरांत तिला कंटाळून पत्नीच्या ओढीनें परत आला, असें दाखवलें होतें.

भय्यासाहेबांना हंसू आलें होतें पुस्तक वाचून. " चाणाक्ष आहे माया, पण भित्री निव्वळ. भलतीच शंका हिला ! मायेला सोडून मी उमाकडे—"

शेजारीं बसलेल्या उमाकडे त्यांनीं मान वळवली. काळाकुट्ट अंधार होता भोंवतालीं.

उमा म्हणत होती,

" मेलं हें ब्लॅकआउट "—

" याच्याहून जास्त ' ब्लॅक आउट लुक् ' आहे तुझ्यापुढं. "

मनांत कोटी करीत होते भय्यासाहेब.

इतक्यांत--

किती वेळ मधें गेला कुणास ठाऊक. भय्यासाहेब भानावर येत होते.

...कुठें आहोंत आपण ?

जमिनीवर ?

वर आभाळ. चांदण्या चम्चम्—

हाय्, हा—डोळ्यांवर काय ओघळतं आहे हें ?

" घाम ?—अन् जानेवारींत ?...

डोळ्यांवरून हात निपटून टाकूं लागले भय्यासाहेब.

...हाय्, ठणकतंय् अंग !

काय झालं ?...

हं. " मेलं हें ब्लॅकआउट " उमा म्हणाली.

—अन् किंचाळली.

—रिक्शावाला किंचाळला.

आपण ताडकन् उठून--

तो पलीकडे पडला आहे रिक्शा.

रिक्शावाला पळाला बहुतेक--तसाच तो गाडीवालाही.

आणि आपण हे असहाय पडलों आहोंत--

अन् उमा--

उमा कुठंय् ?......

चट्कन् भय्यासाहेब उठून बसले. साऱ्या अंगाला वीज चाटून गेल्यासारखे झटके बसत होते. पण कानांवर सारखा आर्त आवाज आदळत होता,--

" उमा, उमा ग, उमा— "

...आपणच मारीत होतों त्या आर्त हांका ?

काळाकुट्ट अंधार—

मरपटतां, चाचपडतां, उमाचा हात हाताला लागला.

गार—

भीतीनें बोबडी वळल्यासारखी झाली आपली.

चांचपडत, उमाच्या तोंडावरून आपला हात फिरला, आणि—

डोळ्यांतून टप्टप् काय पडत होतें तें ?

आपणच का मग ते वेड्यासारखे उठून पळत सुटलों ?

अंग दुखत होतें ?

कोण जाणे, असेल.

डोळ्यांवर सारखें कांहीं ठिपकत होतें.

घाम का तो ?

पण थंडी मी म्हणत होती.

स्टेशनवर टॅक्सीवाला दचकल्यासारखा झाला आपल्याला पाहून. पण दहाची नोट त्याच्या हातांत कोंबून आपण उमा पडली होती तेथें आलों...

...मग हॉस्पिटल.

मग डॉक्टर म्हणाले,

" मिस्टर, तुम्हांला फार इजा— "

" मला ? मला कांहीं नाहीं झालं. पण उमा–अजून बेशुद्धच आहे ती."

" *Don't worry. Don't worry.*" डॉक्टर आपल्या खांद्या-वर हात थोपटीत म्हणाले.

पुन्हां डोळ्यांतून टप् टप् कांहींसें—

खरे म्हणाले ना डॉक्टर ? का उगीच समजुतीसाठीं ?

—उमा आली शुद्धीवर…

भय्यासाहेबांनीं डोळे उघडले. भोंवतालच्या मंडळींकडे त्यांनीं त्रासल्या-सारखें बघितलें. कपाळावर फिरत असलेला हात मान हालवून, झाडून टाकल्यासारखा करीत ते म्हणालें,

" उमा, उमा कुठय् ? बरी आहे उमा ? "

मघांचेच डॉक्टर वाटतें पुन्हां म्हणाले,

" *Don't worry. Don't worry.* छान आहेत त्या. त्यांना नुसता *mental shock* बसला होता. तुम्हीच, महाराज, इतका वेळ घाबरून सोडलं होतंत आम्हांला ! "

" उमाला घाबरण्याजोगं कांहीं झालं नाहीं तर "—

आपल्या छातीवरचा मोठा थोरला दगड दूर झाल्यासारखें भय्यासाहेबांना वाटलें.

आतां त्यांना कपाळावरचा स्पर्श मधुर भासूं लागला.

" माया,–माया— " ते ओठांतल्या ओठांत म्हणाले.

" भय्यासाहेब— "

माया पलंगावर बसून, त्यांचा हात आपल्या हातांत घेत म्हणाली,

" ओळखलंत का मला ? "

भय्यासाहेबांनीं हंसल्यासारखें केलें.

" तुला नाहीं ओळखणार ? "

मायेनें भय्यासाहेबांच्या बोटांशीं चाळवाचाळव केली व त्यांच्याकडे तिरक्या नजरेनें पाहून, मानेला एक जोराचा हिसडा दिला.

आपण उशाशीं उभ्या; आपला हात भय्यासाहेबांच्या मस्तकावर; असें असून भय्यासाहेबांनीं शुद्धीवर आल्याबरोबर "उमा" चें नांव घेतलें हें शल्य सहजासहजीं मायेच्या मनांतून निघून जाणें कसें शक्य होतें ?

पण या रुसव्यांतूनही भय्यासाहेबांविषयींचें तिचें प्रेम उफाळून येत होतें. ती भयासाहेबांकडे टक लावून पहात होती.

काळेसावळे पण मोहक, हंसतमुख. बोलायचे किती गोड; शिकवायचे किती छान,—वागायचे कसे जीव लावून—

मायेला भय्यासाहेब फार फार आवडले होते.

अन् आज तर—

आधुनिक स्त्रीलाही पुरुषाच्या पराक्रमाच्या भुरळींतून निसटतां आलेलें नाहीं.

अंधारी रात्र, निर्जन रस्ता, स्वतःचें सारें अंग ठेंचाळलेलें, हबकलेलें— अन् डोळ्यांवरची, कपाळांतली ती खोल, जीवघेणी जखम—

मायेला हुंदका आल्यासारखा झाला.

"थोडक्यांत निभावलं, नाहींतर डोळाच—

पण आपल्याला झालेल्या भयंकर जखमेची दादच नव्हती गृहस्थाला !

तस्से उठून पळत सुटले; मोटर आणली. हॉस्पिटलांत गेले. डॉक्टरला म्हणतात कसे—

'मला कांहीं झालं नाहीं—'

शाबास ! धन्य आहे यांची.

नाहींतर ती उमा ! दोन तास बेशुद्ध होती म्हणे शॉकनं. केवढा घोर, कसला फास लावला होतान् बयानं भय्यासाहेबांच्या अन् माझ्या गळ्याला !

रक्त वहात असतांना केलेली ती धांवाधांव—कांहींच्या बाहींच व्हायचं एखादे वेळेला— !"

मायेचें अंग शहारलें. भय्यासाहेबांचा हात आपल्या दोन्ही हातांत तिनें जोरानें आवळला.

भय्यासाहेब डोळे मिटून स्वस्थ पडले होते. पेशंटला पूर्ण विश्रांतीची जरूर असल्याचें नर्सनें नम्रपणें सुचवल्यावरून माया जरा वेळानें तिथून उठली.

आठ दिवस झाले या गोष्टीला. भय्यासाहेबांची प्रकृति आतां खूपच सुधारली होती. एक दोन दिवसांत घरीं जायचे होते ते.

पण आपण इतक्या लवकर बरे झाल्याबद्दल त्यांना जसें कांहीं वाईटच वाटत होतें.

घरीं गेले कीं मायेचा चिरसहवास अंतरणार होता त्यांना.

हॉस्पिटलमध्यें माया किती वेळां तरी भय्यासाहेबांना भेटायला यायची, जवळजवळ दिवसभर त्यांच्यापाशींच असायची, म्हणाना ! फुलें घेऊन यायची; छानसा पदार्थ खायला करून आणायची; पुस्तकें वाचून दाखवायची; हलक्या आवाजांत सुरेल भावगीतें गायची; नर्स जरा अलीकडे–पलीकडे झाली कीं, भय्यासाहेबांना गोंडस हस्तस्पर्शानें हर्षवायची.

" छे ! " मायेची दुपारीं वाट पहातां पहातां अस्वस्थ होऊन, भय्यासाहेब स्वतःशीं म्हणाले,

" बस्स झाला हा लपंडाव ! माया सर्वस्वीं आपली होईल, कायमची आपल्याजवळ राहील, अशी व्यवस्था करून टाकलीच पाहिजे आतां लवकर. आज माया आली कीं शेवटचं तिला एकदां विचारायचंच— "

पण मायेचें मन अपघाताच्या विचारांतच अजून घोंटाळत होतें; कुठेंतरी कांहींतरी खटकत होतें; भय्यासाहेबांना त्या प्रसंगाबद्दलच्या कितीतरी गोष्टी अजून विचारायच्या होत्या तिला.

माया आली. भय्यासाहेबांचें आवडतें ' स्नोबॉल पुडिंग ' तिनें डब्यांतून बशींत काढलें; लडिवाळपणें एकएक चमचा भय्यासाहेबांना भरवीत ती गुज-गोष्टी करूं लागली.

बोलतां बोलतां अपघाताच्या गोष्टी निघाल्या.

" कसं वाटलं हो तुम्हाला शुद्धीवर आल्यावर ?—अगदीं प्रथम काय वाटलं ? "

भय्यासाहेब आठवूं लागले.

" प्रथम ? " कपाळावर हात फिरवीत त्यांनीं म्हटलें.

मायेनें पुडिंगचा पांढरा शुभ्र तुकडा चमच्यावर पेलून धरून भय्यासाहेबां-कडे उत्सुकतेनें नजर लावली.

" प्रथम—अग प्रथम अर्थात् विचार उमाचा आला—" भय्यासाहेब भुंवया आकुंचवीत म्हणाले.

मायेच्या चमच्यावरून पुडिंगचा तुकडा बशीत घसरला. तिची नजर खालीं वळली.

" ती होती ना माझ्याबरोबर रिक्शांत— "

भय्यासाहेब जसा कांहीं खुलासा करीत म्हणाले.

" आणि मग ?— "

पुडिंगच्या तुकड्याचा चमच्यानें पाठलाग करीत कांहींशा जड स्वरानें मायेनें विचारलें.

" आणि मग !—आणि मग काय ?—अग, उमा बेशुद्ध होती; काल्या-सारखी गार पडली होती;—तिला शक्य तितक्या लवकर हॉस्पिटलमध्यें घेऊन जायचं—याखेरीज दुसरा विचार काय सुचणार त्या वेळेला मला ? "

माया हिरमुशीच झाली जराशी. उरलेलें पुडिंग भय्यासाहेबांना लवकर लवकर भरवून, बशी चमचा बाजूला सारून, भय्यासाहेबांना चूळ भरायला पाणी आणलें तिनें.

पण भय्यासाहेबांनीं गुळण्या करायचें नाकारलें.

" इतकं सुंदर झालं आहे तोंड; आपण नाहीं चूळ भरणार ! " माया पुन्हां जराशी खुलली.

" इश्श, पुरे झालं ! " असें झटक्यानें बोलून, भय्यासाहेबांना तोंड पुसायला टॉवेल देत, पुन्हां नेटानें तिनें म्हटलें,

" अन् स्वतःचा कांहीं विचार ? म्हणं, दुसरा कसला विचार सुचणार मला ! उठवलं तरी कसं ? किती खोल जखम झाली आहे कपाळावर ! "

" अग, पण भान कुणाला त्यावेळीं त्या जखमेचं ? आपल्याला कांहीं कुठं लागलं आहे, ही जाणीवच झाली नाहीं मला डॉक्टरांनीं हॉस्पिटलमध्यें लक्षांत आणून देईपर्यंत— "

माया पुन्हां अस्वस्थ झाली. बरोबर आणलेलें विणकाम बाहेर काढून ती भराभर! विमनस्कपणें विणूं लागली.

मायेला कशी बोलती करावी ?—-भय्यासाहेबांना विचार पडला.

कांहीं विचार मनांत येऊन, गालांत हंसत, भय्यासाहेब जराशानें म्हणाले,

" मग मात्र, माया, फार, फार भ्यालों मीं; अन् सगळा वेडेपणा झाला हातून, असं वाटूं लागलं—- "

" केव्हां ? " यंत्रासारखें मायेनें विचारलें.

" डॉक्टर म्हणाले, 'फार झालाय् रक्तस्राव. एखादे वेळेस डोळ्यांला धक्का पोंचायचा—' तेव्हां मात्र मी घाबरलों ! म्हटलं, एक डोळयाकडे आमची माया वांकड्या डोळ्यानंसुद्धां पहावयाची नाहीं ! "

मायेनें हसावें म्हणून भय्यासाहेब मोठमोठ्यांदां हंसू लागले.

पण माया हंसली नाहीं. घरीं जाण्याची वेळ होईपर्यंत ती जास्त जास्तच गंभीर बनत गेली.

दुसऱ्याच दिवशीं संध्याकाळीं भय्यासाहेबांना घरीं जायची परवानगी मिळाली.

सकाळपासून माया हॉस्पिटलकडे फिरकली नव्हती. संध्याकाळ झाली. मोटार दाराशीं आली; पण मायेचा पत्ता नव्हता.

कदाचित् माया आपल्या घरीं आपलें स्वागत करण्यासाठीं सज्ज होऊन राहिली असेल, अशा कल्पनेनें भय्यासाहेब मोटारींत बसले.

मोटारींतून उतरतांना त्यांची नजर चौफेर फिरली. पण माया कुठेंच नव्हती !

त्यांच्यासाठीं तयार करून ठेवलेल्या पलंगावर भय्यासाहेबांनीं निरुत्साहानें अंग टाकलें.

इतक्यांत मायेचा चपराशी आंत आला. अदबीनें मुजरा करून, भय्यासाहेबांपुढें त्यानें एक पत्र टाकलें.

मायेची चिठ्ठी !

रागव आला भय्यासाहेबांना जरासा. प्रत्यक्ष यायचें सोडून चिठ्ठया पाठवते आहे ही !

चपराशी गेल्यावर पाकीट उघडलें भय्यासाहेबांनीं.

मायेनें लिहिलें होतें—

**" प्रिय भय्यासाहेब,**

*अपघातांतून बचावून सुखरूप घरीं आल्याबद्दल मी तुमचें अभिनंदन करतें;—आणि भावी अपघातांतून मी व तुम्ही, आपण उभयतां बचावल्याबद्दल मी आपलें उभयतांचें अभिनंदन करून घेतें !*

*भय्यासाहेब, तुम्हीं स्वतःची इतके दिवस फसवणूक करून घेतलीत. माझ्यावर तुमचें निर्विशेष प्रेम आहे, असें तुम्हाला वाटत होतें; उमाला बाजूला सारून, तुम्ही माझ्याबरोबर विवाह करूं इच्छीत होतां. पण भय्यासाहेब, तुमच्या अन्तर्मनाला उमाचीच ओढ आहे, ही गोष्ट तुमच्या लक्षांत आली नाहीं. आपणां उभयतांच्या जीवनांत उमाची अडगळ आहे, असें तुम्हांला वाटत होतें ! पण याच उमाचें जीवित धोक्यांत येतांच तुम्ही स्वतःला विसरलांत, स्वतःचें दुःख, धोका विसरलांत,—मग माझें स्मरण तर कुठलें ! उमाचा जीव सुरक्षित आहे, अशी खात्री पटल्यावर तुम्हांला स्वतःची आठवण झाली, शरीराच्या वेदना जाणवल्या व मग तुम्हीं बेशुद्ध झालांत—*

*भय्यासाहेब, तुमच्या अपघातानें मला वेळेवर बचावलें, अन् तुम्हालाही बचावलें. माझ्याबरोबर विवाह करून तुम्ही कधीं सुखी झालां नसतां. तुमच्या अंतर्मनाला उमाची ओढ कायमची रहाती व आपणां दोघांना अनामिक हुरहुरींत व दुःखांत टाकती !*

*भय्यासाहेब, मी तुम्हाला दोष देतें, असें समजूं नका. उमा कशी झाली तरी तुमच्या मणीची, मधूची, उदयची आई आहे. आज दहा बारा वर्षं एकत्र जीवनांत, रोजच्या व्यवहारांतलीं लहानमोठीं सुखदुःखें, तिनें तुमच्याबरोबर काढलीं आहेत.*

*तुमच्या बहिर्मनाला नावीन्याची, उमलत्या तारुण्याची, नुसत्या हौसेमौजेची भुरळ पडली; पण तुमचें सुप्त अन्तर्मन दहा उन्हाळे पावसाळे ज्या सहचरीजवळ काढले, त्या उमालाच बिलगून राहिलें होतें, हें या अपघातानें उघड करून दाखविलें नाहीं का ?*

*भय्यासाहेब, वेळींच तुमच्या अंतर्मनाचा कल ओळखून शहाणपणानें, संयमानें, मी तुमच्या मार्गांतून दूर होत आहे. तुम्हीही तुमच्या इमानी अंतर्मनानें पटवून दिलेल्या खुणेला जागा व उमाला सुखी करून सुखी व्हा !*

**माया.** ”

भय्यासाहेबांनीं पत्र वाचून कांहींसें त्राग्यानें जमिनीवर फेंकलें व आवेशानें ते म्हणाले,

“ खुळी, खुळी कुठली-- ”

समोर खुर्चीवर बसलेली उमा डोळे पुशीत होती.

“ आतां काय झालें रडायला ? ”

“ आनंदानें रडतें आहे मी ! ” उमा हुंदका आवरीत म्हणाली, “ देवानें

हा दिवस दाखवला! त्या मेल्या काळरात्रीपासून जीव टांगणीस लागला होता नुसता!"

अश्रूंनीं भिजलेल्या व हास्यानें फुललेल्या उमाच्या चेहऱ्याकडे पहातां पहातां.—

भय्यासाहेबांनीं डोळ्यांची उघडझांप केली; घसा साफ केला--

"खुळ्यांचा बाजार आहे झालं!-- "

अर्धे त्रासून, अर्धवट हंसत ते म्हणाले व मायेचें पत्र उचलून त्याचे तुकडे तुकडे करूं लागले.



# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें